# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

श्रीरुक्मिणीस्वयंवराच्या सर्वश्रुत कथानकांत, रसपरिपाककरितां आणि श्रीकृष्ण व रुक्मिणी यांच्या चरित्रांतील उदात्त तत्त्वें प्रेक्षकांच्या पुढें प्राधान्येंकरून आणण्याकरितां, कांहीं फेरफार करून हें नाटक रचलेलें आहे. नाटकांतील चाली प्रि० **भास्करबुवा बखले** यांजकडून मुख्यतः घेतल्या असून **'गंधर्व नाटक मंडळीं'**तील रा. रा. **बालगंधर्व** आदिकरून गायनपटु नटांनींहि ह्या कामीं चांगली मदत केली आहे. ह्याबद्दल **'गंधर्व नाटक मंडळी'** व प्रि० **भास्करबुवा बखले** यांचा मी फार आभारी आहें. पुस्तकांतील चित्रें **'गंधर्व नाटक मंडळीं'**तील नटांच्या त्या त्या प्रसंगांच्या फोटोंवरून तयार केलेलीं आहेत. सदर फोटो दिल्याबद्दल व फार परिश्रम घेऊन नाटक बसविल्याबद्दल **'गंधर्व नाटक मंडळीं'**चे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.



पुणें, सोमवार तारीख ४ डिसेंबर १९१६. }



ग्रंथकर्ता



॥ श्री ॥

# संगीत स्वयंवर.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

[ सूत्रधार व पारिपार्श्वक पूजन करीत प्रवेश करितात. ]

नांदी.

पद १ ( राग–भूप, ताल–त्रिवट, ' दीम् दारा घेतेले तानोम् ' या चालीवर. )

धीरवीर–पुरुष–पदा नमन असो। खलबल–दुरित–भूभार–नाशे, सहज जो करितसे जनरक्षण ॥ धृ० ॥ अपजय–जय–कर कुशल अति मति जयासि वरितसे। ' सुखदुःख जरि, समसमान कृति '–निज प्रकृति मिरवितसे जो अवतार–योगें ॥ १ ॥

पद २ (राग–मल्हार, ताल–झपताल. 'देखे सखि आज रघुनाथ' या चालीवर.)

शांत हरि हास्य धरि; सौख्य झालें जनीं ॥ धृ० ॥ शेषशयी जलीं एकला श्रीपती घेतसे मननसुख, मर्दुनी खला रणीं ॥ १ ॥ श्री दिसत त्यागहत, खेदमूर्ती खरी। धुंडितां सुर-भुवन, ना दिसे हरिचरण, द्यावया प्राण, मग चालली सागरीं ॥ २ ॥ साहसचि भेटवित देव–चरण क्षणीं। सेवनीं हरि-

**पदीं, श्री, स्वमुख पाहतचि, विस्मिता, विकसवी पतिनयन;**
**त्या क्षणीं, शांत हरि हास्य धरि; सौख्य झालें जनीं ॥ ३ ॥**

**सूत्रधार:**—शेषशाई भगवानाचें भजन–पूजन केल्यानें मन शांत झालें आहे; आतां संसारकृत्याकडे वळण्यास हरकत नाहीं. जा, तुम्हीं हीं पूजापात्रें आराध्यदेवतेजवळ ठेवून, रुक्मिणीच्या स्वयंवराचे वेळीं जमणाऱ्या राजांचें मनोरंजन करण्याकरितां कुंडिनपुरास जाण्याची तयारी सर्व नट-वर्गानें केली आहे कीं नाहीं तें पहा. (पारिपार्श्वक जाऊं लागतात.) हें पहा, कुंडिनपुरास जाण्याकरितां निघण्याचा मुहूर्त आतांच आहे; मीं पंचांग पाहून हा शुभ मुहूर्त शोधून काढला आहे; तेव्हां कोणीहि नटानें मागें रेंगाळत राहून हा मुहूर्त वायां जाऊं देतां कामा नये, असें सर्वांना बजावून सांगा. (पारिपार्श्वक जातात.) अरे, हें काय ? कुंडिनपुरास जाण्याकरितां आतांच्या मुहूर्तानें निघावयाचें म्हणून मीं सर्व नटांना आज्ञा केली असतांना, ही माझी प्रिया नटूनसजून येथें कशी येत आहे ! (नटी येते.) स्वयंवराकरतां सजलेल्या राजकन्येचा थाटमाट आतांच आपण कां केलांत ? मला स्वयंवराचें नाटक करून दाखवावयाचें आहे तें कुंडिनपुरांत !

**नटी:**—पण कुंडिनपुरचें आपणाला आमंत्रण कुठें आहे ? सर्व नट-वर्गांत आपण श्रेष्ठ; सर्व राजे सन्मानानें आपणाला आमंत्रण देऊन नाटक करायला सांगत असतात; तेव्हां म्हटलें, कुंडिनपुरचें आमंत्रण जर आपणास नसलें तर आपण तेथें जा कशाला ?

**पद ३** (राग–पिलु जिल्हा, ताल–पंजाबी. 'सावरिया मन भायोरे' या चालीवर.)

**नच कधीं रस सेवाया, सोडा स्थान ॥ धृ० ॥ जरि प्रेम नसे**
**गुण–रस विरसे; पर–गृह–वासें अपमानें जाई प्राण ॥ १ ॥**

आमंत्रणाशिवाय कांहीं कुंडिनपुरास जावयाचें नाहीं. शिवाय, यादवसेना सर्व येथें जुळली आहे; उदईक ही मंडळी कुंडिनपुरास जाणार; तेव्हां म्हटलें, कुंडिनपुरचें जर आपणास आमंत्रण नाहीं तर श्रीकृष्णाचे ह्या

अनुयायांपुढें आतां येथेंच स्वयंवराचें नाटक करून दाखवा, म्हणजे झालें,-मथुरेस आपण गेलों होतों, त्या वेळीं तर हें नाटक पाहून श्रीकृष्ण फार खूष झाले होते!

**सूत्रधारः**—अग हें कृष्णाचेंच नाटक; तेव्हां ते खूप व्हावयाचेच! यमुनेच्या कांठीं खेळत असतां गोपगोपींच्या रासक्रीडेकरितां मुरलीधरानें रचलेलें आपलें नाटक! स्वतःची कृती स्वतःला आवडली नाहीं, असें कधीं झालें आहे!

**नटीः**—म्हणूनच म्हणतें, भीष्मकराजाचें आमंत्रण जर आम्हांला नाहीं तर त्या स्वयंवराचे धादलींत जा कशाला, आमचें नाटक पहातां का म्हणून आर्जवें कशाला, आणि अगांतुकीचीं दुःखें भोगा कशाला? आयते हे कृष्ण-भक्त येथें जुळले आहेत, ह्यांच्याच पुढें स्वयंवराचें नाटक करून दाखवूं म्हणजे झालें; आमचें नाटक पाहून ह्यांना आनंद होईल, आणि ह्यांच्या आनंदानें आपण सुखी होऊं—अगांतुकासारखें कांहीं नको जायला कुंडिनपुरला.

**सूत्रधारः**—छे! तसें नाहीं. कुंडिनपुरला जायला आतांच निघालें पाहिजे. आपणाला आमंत्रण काय करायचें? योद्ध्यांत आज श्रीकृष्ण ज्याप्रमाणें सर्वांत श्रेष्ठ, त्याप्रमाणें नटांत आम्हीं सर्वांत श्रेष्ठ! श्रीकृष्णाला तरी रुक्मिणीच्या ह्या स्वयंवरासाठीं आमंत्रण कोणी पाठविलें? आज कुंडिनपुरांत यादवाधिपतीची स्वारी प्रवेश करणार ती भीष्मकराजाच्या आमंत्रणावरून थोडीच आहे! कोणी बोलाविलें नाहीं, कांहीं नाहीं; उलट, 'न येतील तर बरें' असें पर्यायानें सुचविण्यांत आलें होतें! पण श्रीकृष्ण आमंत्रणाशिवाय आलेना? "महाजनो येन गतःस पन्थाः" श्रीकृष्णाप्रमाणें आमंत्रणाशिवाय कुंडिनपुरास जाण्यास आम्हांस कोणती हरकत? अग, जेथें रसिक जमले, तेथें आम्हीं जावयाचेच; आमचे गण हेंच आमचें आमंत्रण; रसिकांची तल्लीन वृत्ति हीच आमची बिदागी.

पद ४ (राग—हमीर, ताल—सुरफाक्ता. 'चौदा कमलमें' या चालीवर.

कृष्णगुरु जसा कुंडिनपुरिं आला। सज्ज नटगण तसा गुण-स्वयंवराला ॥ धृ० ॥ धर्मचि सकल कृष्ण हा झाला; गुण मानिला स्थान सन्मानाला ॥ १ ॥

( शिशुपाल व रुक्मी प्रवेश करितात. )

शिशुपाल:—आमंत्रणाशिवाय हा कृष्ण येथें कसा आला ?

रुक्मी:—ह्या अगांतुकाला कुंडिनपुरच्या वेशीबाहेरच अडकवून ठेवलें पाहिजे होतें. अगांतुकाकरितां माझ्या बहिणीचें स्वयंवर आरंभिलें आहे, असें ह्या गवळ्याला वाटलें तरी कसें ?

पद ५ ( राग—मुलतानी, ताल—त्रिवट. 'इन दुरजन' या चालीवर. )

जरि दिसला दुर्जन मला येथें, तरि वेशीआंतुनी पळविन जसा कुटिल दुष्ट कावळा; कुक्कुट—गण न बोलाविला ॥ ॥ धृ० ॥ हंससरसिं शुभ—विवाह मंगल, सुटली हाव या गृध्राला ॥ १ ॥

मला वाटतें, बाबांची फूस ह्या कामीं असली पाहिजे.

शिशुपाल:—मलाहि तोच संशय येतो.—पण एकार्थी बरें झालें—सम्राट जरासंध महाराजांनीं मथुरेच्या युद्धांत यादवांवर दया केली, आणि त्यामुळें माझ्या तावडींतून तो कृष्ण सुटला; पण आज कंसाच्या वधाचा सूड उगविण्याची घटका भरली, असें मला वाटतें. अगांतुकाला माझ्यासमोर येऊं द्या, मशकाप्रमाणें त्याला चिरडून माझ्या मनगटाच्या वरवंट्याखालीं त्याच्या पैलवानी हाडांचें चूर्ण करतों.

रुक्मी:—कृष्णवधाची वेळ जवळ आली म्हणून मला आनंद वाटतो खरा, पण बाबांनीं माझी फसवणूक कां करावी ? मी जाब विचारल्याशिवाय राहणार नाहीं. मी पहातों आहें, कंसवधापूर्वी बाबा निमूटपणें

माझें ऐकत असत. पण कंसवधापासून बाबांच्या पुत्रद्रोहानें पुन्हां उचल केलेली दिसते. कृष्णाला जर बाबांची फूस असली—बाबा, खूप समजून असा, रुक्मिणीचा व माझ्या मित्राचा विवाह होण्याबरोबर कुंडिनपुरचा राजमुकुट—

**शिशुपाल:**—आणि कुंडिनपुरच्या राजमुकुटाबरोबरच सम्राट जरासंध महाराज ह्यांच्या सेनेचें आधिपत्य माझ्या मित्राच्या—ह्या वीरमणी रुक्मीच्या पायांवर लोळूं लागेल! [ रुक्मिणी येते.

**रुक्मिणी:**—दादा, तुम्ही असे नुसते उभे—ते आलेना? सामोरे नको का जायला?—ते आलेना! अगबाई! हे देखील येथेंच! पण दादा, ते आलेना?

**रुक्मी:**—ताई, अशी गोंधळलीस कां? ते म्हणजे कोण आलेग! शिशुपाल महाराज तर येथेंच आहेत. ज्यांना पाहून तुला लाजल्यासारखें व्हावें ते हे नरवीर तर येथेंच आहेत—

**रुक्मिणी:**—पण ते आलेना? पाहिलें नाहीं का? सामोरें नको का जायला? ते आलेना, दादा?

**शिशुपाल:**—रुक्मी, हाच तो कृष्ण, हाच तो दगाबाज कंसारी, हाच तो पळपुट्या यादव! रुक्मी, तुमच्या ह्या राजवाड्याच्या अंगणांत ह्याच्या रक्ताचा सडा शिंपून ह्या त्रैलोक्यसुंदरीच्या स्वयंवराचे मंगलकार्यास आरंभ करूं या.

**रुक्मी:**—ताई, तूं कां गोंधळलीस तें मला समजलें; आतां मी आणि शिशुपाल मिळून—

**शिशुपाल:**—ह्या अगांतुकाचा चेंदामेंदा करून टाकतों; म्हणजे मग आमचे विवाहाला कोणतीच हरकत उरणार नाहीं.

[ रुक्मी व शिशुपाल जातात.

**रुक्मिणी:**—मी करायला गेलें एक आणि झालें भलतेंच!—हे गेले त्यांचा अंगावर धांवून! बाबा, बाबा, अहो धांवाहो धांवा.—येथें कोणी

नाहीं हें कसें ?–धांवा हो धांवा.–बाबा, बाबा, कोणी नाहीं–तर–मी आलें हो आपल्या मदतीला. माझें मन हिरावून घेऊन आपण प्रथम दोन हाताचे चतुर्भुज झाला आहांत, आणि नंतर आमच्या अंगणांत पाऊल ठेवलें आहे–माझी मदत कशी घ्याल ? माझी मदत घेण्याचा आपणाला, व मदत करण्याचा मला, दोघांनाहि सारखाच हक्क आहे.–नको म्हणतां मदत ?–हो हो नकोच. विश्वाचें सामर्थ्य त्या बाहूंत एकवटलें आहे, मग अबलेची मदत काय करायची ?–दादाला व शिशुपालाला पहा कसें लीलेनें त्यांनीं जागच्या जागीं डांबून ठेवलें !

पद ६ ( राग–यमन, ताल–त्रिवट. 'हाबरा मोरा' या चालीवर. )

**नाथ हा माझा मोही खला; शिशुपाला भारी झाला, वीर रुक्मी शिशुसम आणिला ॥ धृ० ॥ वीरा लोळवि, मग हळु धरुनी, कर–रत्नाला जणु हा ल्याला ॥ १ ॥**

शिशुपालाला आणि रुक्मीला–मत्तगजेंद्रांना–दोन्ही हातांत लीलेनें पकडून धरून सिंहाप्रमाणें ते इकडेच येत आहेत ! ह्या विजयी वीराची दृष्ट काढायला नको का ? निरांजन घेऊन यांना ओवाळलें पाहिजेना ?–हे आलेच !

[ रुक्मी व शिशुपाल ह्यांना हातांनीं धरून श्रीकृष्ण येतो. ]

**कृष्ण:**—रुक्मी, शिशुपाल, जा तुम्हांला सोडून दिलें आहे. ह्या शुभांगीच्या प्रथम दर्शनाचे महोत्सवाचे वेळीं तुम्हांला बंधमुक्त केलें आहे.

**रुक्मिणी:**—( स्वगत ) मी अशी गोंधळून कशी गेलें आहें !–बाबा येथें नाहींत–मी बोलूं तरी कशी यांच्याशीं ?

**कृष्ण:**—जा, तुम्हांला बंधमुक्त केलें आहे.–असे उभे कां ? असे भांबावल्यासारखे कां ? असे वेड्यासारखे—

**रुक्मिणी:**—आपलें दर्शन कोणाला वेड लावणार नाहीं !

**कृष्ण:**—हें दर्शन सर्वांना वेड लावील.–जा, रुक्मी, तुझ्या बहिणीनें तुला बंधमुक्त केलें आहे; जा, शिशुपाला, ह्या त्रैलोक्यसुंदरीच्या कोमल

अंतःकरणानें तुझ्यावर दया केली आहे. नाजुक अबलांनीं लावलेलें वेड कठोर वृत्तींना मर्यादित करीत असतें.

**रुक्मी:**—घरच्या बायकांना शत्रूनें वेड लावलें असतां पुरुषांच्या कठोर वृत्ति बेफाम होत असतात.–कृष्णा, राजवाडयांत रक्तपात नको म्हणून मीं गय केली; शक्तीचा दिमाख दाखवूं नकोस.

**शिशुपाल:**—कोणत्याच मर्यादा हा पाळणार नाहीं. आम्हीं तलवार म्यानांतून उगीच बाहेर काढली नाहीं.–रुक्मी, आमच्या खड्गांना ह्याचा बळी रुक्मिणीच्या देखत दिला पाहिजे. [ तलवार उपसतात.

**कृष्ण:**—मी निशस्त्र असलों तरी तुम्हां दोघांना भारी आहें.–ह्या माझ्या वज्रमुष्टीवर तुमचें खड्ग खुशाल चालवा.

**रुक्मिणी:**—अहो बाबा, बाबा, धांवाहो धांवा. [ जाते.

**कृष्ण:**—या, या, माझ्या अंगावर तलवारी चालवावयाला या.

**पद ७** ( राग–श्रीराग, ताल–एका. 'धृमधृनिसा' या चालीवर. )

**मी वज्र–मुष्टि, रिपुगण चूर्ण करिन; होत गिरिवरि जललहरी**
**बहु कणकण ।। धृ० ।। मरण बाहु हा, अरिवर रणांत देख-**
**तांचि झाले कष्टी ।। १ ।।** [ भीष्मक येतो.

**भीष्मक:**—कोण ? कृष्ण ? रुक्मी, शिशुपाल, तुमची येथें लढण्याची तयारी ! सरा, मागें सरा, आणि विदर्भदेशच्या ह्या भीष्मकाच्या आज्ञेनें तलवारी म्यानांत घाला.–कृष्णा, तूं येथें असा अवचित कसा आलास ?– घाला म्हणतोंना तलवारी म्यानांत.

**रुक्मी:**—बाबांच्या आज्ञेपुढें नाइलाज आहे.

**शिशुपाल:**—माझ्या भावी श्वशुरांना सुप्रसन्न ठेवण्याकरतां ह्या वेळेला कृष्णा, तुला जीवदान दिलें आहे. [ रुक्मी व शिशुपाल जातात.

**भीष्मक:**—कृष्णा, तूं येथें असा अवचित कसा आलास ? आम्हांला अगोदर कळवायला कोणती हरकत होती ? वेशीबाहेर सामोरे येऊन आम्ही

तुझ्यासारख्या वीररत्नाचा आदरसत्कार करायला चुकलों असतों, असें का तुला वाटलें ? बलराम वगैरे यादववीर नाहींका तुझ्याबरोबर आले ?

**कृष्ण:**—यादवसेना मागाहून येत आहे. राजकन्येचें स्वयंवर आजच आहे, असें समजल्यामुळें मी एकटाच पुढें धावून आलों ! स्वयंवराला मला आमंत्रण नसल्यामुळें स्वयंवराचे मंडपांत एवढ्यानें घुसून तेथेंच मी आल्याची वर्दी स्वतःचे मुखानें कळवावी, म्हणून पहारेकऱ्यांना दूर सारून राजवाड्यांत शिरलों—

**भीष्मक:**—आणि त्यामुळें हा लढण्याचा प्रसंग गुदरला ! कृष्णा, आमच्याकडून आमंत्रण गेलेलें नसलें तरी असलें साहस जरा दांडगाईचें दिसत नाहीं का ?

**कृष्ण:**—तरुणांचा साहसी उतावीळपणा प्रेममूलक असल्यावर गुरुजनांना अडदांडपणाचा दिसत नाहीं. गुरुजनांच्या असल्या प्रेमळ उदारतेवर भिस्त ठेवून राजकन्येच्या स्वयंवराकरितां घाईघाईनें आलों आहें.

**भीष्मक:**—मी तुला दोष देत नाहीं; किंबहुना असलें वर्तन तरुणांना शोभतेंहि !—वेशीबाहेर नाहीं तर नाहीं, आतां अंतःपुरांतच तुझें आगतस्वागत मला करूं द्या. मी आतां घाईघाईनें करणार असलेला तुझा सत्कार सम्राटाच्या सेनेला सतरा वेळ मागें हटविणाऱ्या वीराला साजेसा जरी नसला, तरी स्नेहाची पूजाअर्चा स्नेही करीत आहे हें ओळखून बाह्योपचारांवर तूं लक्ष ठेवूं नकोस.

**कृष्ण:**—महाराज, आपल्या ह्या गोड उद्‌गारांनींच माझा पूर्ण सत्कार झाला आहे.

**भीष्मक:**—हा असा ये अंतःपुरांत.

**कृष्ण:**—रुक्मिणीच्या आतांच्या दर्शनानें माझें जें आगतस्वागत झालें त्याहून अधिक आगतस्वागत कोण आणि कसें करणार ?

पद ८ (राग–पूर्वी, ताल–त्रिवट. 'मथुरा न जावो मेरा कान्ह' या चालीवर.)

रमणि मजसि निजधाम, सन्मुख रुक्मिणी ॥ धृ० ॥ नयनें
बोले 'स्वागत केलें; नरवरा, करा आराम' ॥ १ ॥

---

## प्रवेश दुसरा

[स्नेहलता, व मुली गात प्रवेश करतात.]

पद ९ (राग-सारंग, ताल-खेमटा-दादरा-धुमाळी. 'भले आये कुंवर' या चालीवर).

सुख अहा! नयनसुख! येत हा, समरराजा कृष्ण हा।
सुवार्ता कळवुनि, सुखातें नव वरुनि, डुलति ह्या हृदयिं
खुलति ह्या, नर्तनीं रमवुनि मन पहा ॥ धृ० ॥ हा सुखद
दिन, निज दर्शन घडवि यादव हा; तें आगत तें स्वागत तें
पावत यदु हा; तव मन–विलोभ मनन–विषय सुलभचि
ठरला, हा मजला, हा सकला, सुलभ हा ॥ १ ॥

**स्नेहलता:**—अग रुक्मिणी, श्रीकृष्ण आल्याची आनंदाची बातमी सांगायला ह्या दासी आल्या आहेत. [रुक्मिणी प्रवेश करते.

**रुक्मिणी:**—स्नेहलते, ही आनंदाची बातमी कळविल्याबद्दल त्यांना हें बक्षीस दे. [स्नेहलता बक्षीस देते; मुली मुजरा करून जातात.] स्नेहलते, तुला मी एक अधिक आनंदाची बातमी सांगणार आहें; तूं काय बक्षीस मला देशील?

**स्नेहलता:**—अग, आतांच्या ह्या बातमीहून दुसरी कोणची आनंदाची बातमी असणार? पाण्यांत देव ठेवून ज्यांच्या आगमनाची वाट तूं इतक्या दिवस पहात होतीस, ते आले; आणखी कोणची अधिक आनंदाची बातमी?

**रुक्मिणी:**—अग, ते आल्याची बातमी सर्वांच्या अगोदर मला समजली; अग, हें बघ कीं नाहीं, सर्वांच्या अगोदर मीच त्यांना पाहिलें;

आणि मीं अगोदर ओळखलें तेच ते म्हणून. अगोदर ओळखलें; सर्वांच्या आधीं मीं ओळखलें; दादाच्या अगोदर मीं त्यांना पाहिलें; आईच्या अगोदर मीं त्यांना पाहिलें; बाबांच्या अगोदर मीं पाहिलें; सर्वांच्या आधीं मीं पाहिलें. दुसरें कोणी नाहीं प्रथम पाहिलें; प्रथम मीं पाहिलें.

**स्नेहलता:**—होय का ? प्रथम दर्शन तुला का झालें ?

**रुक्मिणी:**—अग हो, अगदीं खरें. प्रथम दर्शन मला घ्यायचें झालें. मीं सर्वांच्या अगोदर पाहिलें, प्रथम मीं पाहिलें.

**स्नेहलता:**—आणि मग ?

**रुक्मिणी:**—आणि मग काय ? पाहतांक्षणीं ओळखलें, तेच ते म्हणून. हें बघ कीं नाहीं, मीं पूर्वीं कधीं पाहिले नव्हते; तुझ्या तोंडून त्यांचे गुण तेवढे ऐकिले होते; पण बाई पाहतांक्षणीं ओळखलें तेच ते म्हणून, अगदीं पाहतांक्षणीं ओळखलें; आणि सर्वांत मोठें आश्चर्य, त्यांनीं देखील ओळखलें—

**स्नेहलता:**—काय ओळखलें ? मध्येंचशी लाजलीस ?

**रुक्मिणी:**—दुसरें काय ओळखलें ? तीच ती मी असें त्यांनीं मला ओळखलें आणि तेच ते हे असें मीं ओळखलें ! अगदीं पहिल्या नजरा-नजरेस आम्हीं एकमेकांना ओळखलें.

**पद १०** (राग–बिहाग, ताल–त्रिवट. 'प्रभु लीला गमते ही' या चालीवर.)

**मम आत्मा गमला हा, नकळत नवळत हृदय तळमळत,**
**भेटाया ज्या देहा ॥ धृ० ॥ एकचि वेळ जरी मज भेटला,**
**जीव कसा वश झाला, भाव दुजा मिटला; वाटे प्राणसखा**
**आला परतुनि गेहा ॥ १ ॥**

**स्नेहलता:**—बरें मला विशष आनंदाची कोणची बातमी सांगणार आहेस ?

**रुक्मिणी:**—वा ! ही विशेष आनंदाची नव्हे का बातमी ?—अग खरें, मी सांगणार आहें तें—हो, ह्याहूनहि पुढेंच खरी गम्मत झाली.

**स्नेहलता:**—मग सांग ना ती मौज.

**रुक्मिणी:**—अग मीं दादांना सांगितलें ते आले म्हणून; तो मेला शिशुपाल दादाजवळ होता, तरी सांगितलें ते आले आहेत म्हणून.

**स्नेहलता:**—हें तूं मला मघाशींच सांगितलेंस !

**रुक्मिणी:**—अग, तो मेला शिशुपाल जवळ होता तरी भ्यालें नाहीं. अगदीं धिटाईनें बोललें;—अगदीं धिटाईनें—त्याला कस्पटाप्रमाणें लेखून बोललें.

**स्नेहलता:**—होय का? शिशुपालाची भीति तुला बिलकूल नाहीं का वाटली ?

**रुक्मिणी:**—त्यांचें दर्शन झाल्यावर भीति कोणाची वाटणार ? पण खरा आनंद तो ह्याहून पुढें आहे.—हें बघ कीं नाहीं, मी दादाच्या देखत—शिशुपालाच्या समोर— त्यांच्याशीं बोललें देखील !

**स्नेहलता:**—खरेंच का ? काय बोललीस तूं ?

**रुक्मिणी:**—अग, ते देखील माझ्याशीं बोलले—तूं जवळ असतीस तर तूं मला अगदीं निर्लज्जच म्हटलें असतेंस.

**स्नेहलता:**—ते काय म्हणाले, तूं काय बोललीस ?

**रुक्मिणी:**—ते काय बोलले तें मला आठवतें; पण मी काय बोललें, हें मला आठवतच नाहीं—त्यांचें पाहणें, त्यांचें वागणें, त्यांचें बोलणें सर्व सर्व आठवतें—आतां मी त्यांना पाहत आहेसें वाटतें, आतां ते माझ्याकडे येताहेतसें वाटतें—पण बाई, माझें मला कांहीं आठवतच नाहीं !—माझी स्वत:बद्दलची शुद्धच तेव्हांपासून नाहींशी झालेली दिसते; नाहींतर मी इतकी निर्लज्जपणानें वागलें असतें का ?

**स्नेहलता:**—तरुणींना निर्लज्ज करण्याची हातोटी श्रीकृष्णाला उत्तम साधली आहे, असें मथुरेस सर्व लोक म्हणतात; आणि म्हणूनच स्त्रियांच्या संबंधानें त्यांना सज्जन न मानण्याचा प्रघात त्यांच्या वैऱ्यांनीं पाडला आहे.

**रुक्मिणी:**—अग हो, हेंच मी तुला मुद्दाम सांगणार होतें. तूं एकदां म्हणाली होतीस स्त्रियांच्या बाबतींत ते कांहीं तितके सज्जन नाहींत म्हणून; तूं खरें बोललीस, असा पहिल्याच भेटीला मला अनुभव आला !

**पद ११** ( राग–भूप, ताल–त्रिवट. 'फुलवनसेज सवारू' या चालीवर. )

**सुजन कसा ? मन चोरी ! अग हा–चोरी–यदुकुलनंदन ॥ धृ० ॥ सहज नेत्र भिडे; सहज मोह पडे; सहजचि करी मम हृदय हें वेडें; विलीन—लोचन—मार्गें शिरत घरीं; मन चोरी ॥ १ ॥**

म्हणून बघ तूं नेहमीं माझ्याजवळ ऐस आणि मी निर्लज्ज होऊं लागलें म्हणजे मला सावध कर. [ रुक्मी व दिनेश्वर येतात.

**दिनेश्वर:**—मीं प्रथमच आपणांस सांगितलें होतें, दिवसा जर कृष्णाची व ताईसाहेबांची गांठ पडली तर अपशकुन होईल म्हणून. कृष्णाला सूर्य चांगला आहे, आणि ताईसाहेबांना चंद्र चांगला; आणि दिवसा जर चंद्रासमोर सूर्य आला तर सूर्य चंद्राला खातो, असा आम्हां ज्योतिषांचा सिद्धांत आहे; रात्रीं काळोखांत जर चंद्रापुढें सूर्य आला तर चंद्र तेवढा उगवतो आणि सूर्य काळोखांत पुरला जातो. तेव्हां उद्यां सूर्यास्तानंतर चंद्रोदय झाल्यावर गोरज मुहूर्तावर स्वयंवर सुरू करा, म्हणजे सूर्याबरोबर कृष्णाचाहि अस्त होईल.

**रुक्मी:**—पण उद्यांचा स्वयंवराचा मुहूर्त तुमच्या सांगण्यावरूनच निश्चित केला होता, मग आज कृष्ण कसा येऊन पोहोचला ?

**दिनेश्वर:**—कसा म्हणजे तो सकाळीं आला; सूर्य उगवल्यावर आला. आज रात्रीं ये म्हणावें ! आज नाहींतर काल रात्रीं ये; ये, ताकद असली तर काल रात्रीं ये. मीं लिहून दिलेली पत्रिका आड धरा, पत्रिकेवर डोकें आपटून घेऊन आपोआप परत जाईल ! पत्रिका वज्राहून अधिक काम देते; मुहूर्त मात्र बरोबर साधला पाहिजे. माझ्या पत्रिकेची ढाल करा, माझ्या

पत्रिकेचें कवच अंगांत घाला, माझ्या पत्रिकेचें वज्र हातांत धरा, आणि काल रात्रीं कृष्णाला येऊं द्या.

**रुक्मी:**—काल रात्रीं नको; आज रात्रीं काय होईल तें सांगा, उद्यां रात्रीं काय होईल तें सांगा.

**दिनेश्वर:**—काल रात्रीं जें झालें, तें आज रात्रीं होणार; आज रात्रीं जें झालें तें उद्यां रात्रींहि झालें म्हणून समजा.

**रुक्मी:**—काल रात्रीं कांहीं झालें नाहीं;—

**दिनेश्वर:**—मग आज रात्रींहि कांहीं झालें नाहीं, उद्यां रात्रींहि कांहीं झालें नाहीं. काल, आज व उद्यां हीं तिन्हीं आम्हां ज्योतिष्यांना सारखींच. आम्ही ग्रहांनीं–आम्हीं जिवंत ग्रहांनीं–झालें म्हटलें आणि तें प्रत्यक्ष झालें नाहीं–हो कदाचित् तें झालें नाहीं–तरी तें खोटें नव्हे. केंव्हांतरी तें होऊन गेलेलेंच असलें पाहिजे; आणि फार पूर्वी होऊन गेलेलें नसलें तरी ह्या युगांत नाहीं तरी पुढच्या युगांत तरी होणारच असलें पाहिजे.–सामान्य जनाकरतां वर्तमान, भूत व भविष्य असे तीन काळ आहेत, पण आम्हांला सर्व काळ एकच. नाहीं तर नाहीं; होय तर होय; चूक व्हावयाची नाहीं. आज रात्रीं तुम्हाला अनुभव येईल.

**रुक्मी:**—बरें, आज रात्रींचा माझा बेत साधला तर तुमच्या ज्योतिषावर माझा विश्वास बसेल.

**दिनेश्वर:**—अहो, बसेल म्हणजे बसला, बसून गेला, पक्का झाला; आपण बक्षीस तेवढें द्यावयाचें बाकी राहिलें आहे.

**स्नेहलता:**—अहो बक्षीस द्यावयाचें म्हणजे काय, दिलें, देऊन चुकलें, देण्याचें बाकी राहिलें नाहीं.–बक्षीस मिळालें, एवढें आपण कबूल करावयाचें काय तें उरलें आहे.

**दिनेश्वर:**—तेंहि उरलें नाहीं. आपणांकडून तेंहि मिळालें.

**रुक्मी:**—रुक्मिणी, ह्या कृष्णाच्या संकटांतून तुम्हाआम्हाला आज रात्रीं सोडविण्याचा मीं बेत केला आहे.

**रुक्मिणी:**—म्हणजे दादा, आज रात्रीं छापा घालून तूं कांहीं भलतेंच करणार आहेस काय?

**रुक्मी:**—तुझ्या मनांत शंका आली तसलें काळेंकुट्ट कृत्य करणेंहि गैर होणार नाहीं; कारण कंसाला कपटानें मारणारा हा कृष्ण!—पण जाऊं द्या; मी सरळ मार्गानें जाणार आहें.

पद १२ (राग—पूरिया, ताल—त्रिवट. 'करतिल विदुषी' या चालीवर.)

**मिळविन विजया सुकर्म-योगें, विमर्दुनि रणांमाजि तयाला।**
**धीरवीर-धर्म-वर्म जगतीं सरल पथ गमे, प्रिय मजला**
**॥ धृ० ॥ म्हणतिल सारे "कृष्णा नीचा, ढोंग सोड सोंग**
**सोड; भजरे, जाणुनि ईशचि, शिशुपाला" ॥ १ ॥**

तेव्हां ताई, तुला विचारायला आलों, तूं मात्र भलतासलता हट्ट नाहींना धरून बसणार?

**रुक्मिणी:**—दादा, आजपर्यंत माझें असें कोणतें गैरवर्तन झालें म्हणून तूं मला हा प्रश्न विचारावास? माझें कुठें चुकलें का?

**रुक्मी:**—चुकलें असें नाहीं; सकाळीं कदाचित् तूं भांबावूनहि गेली असशील. पण कृष्णाशीं आम्ही समोरासमोर लढण्यास तयार झालों असतांना तूं बाबांना कां हाका मारल्यास?

**रुक्मिणी:**—अरे अंतःपुरांत जर तुम्ही लढूं लागलां तर आम्हीं बायकांनीं नुसतें—नुसतें—

**रुक्मी:**—हो, तें आमचेंच चुकलें; म्हणून आम्हीं म्यानांत तलवारी घातल्या. पण कायग रुक्मिणी, उद्यां स्वयंवराचे वेळीं—

**रुक्मिणी:**—मला जो पसंत पडेल, त्याच्या गळ्यांत मी माळ घालीन.

**रुक्मी:**—मी तुला हेंच विचारतो आहें, मंडपांत जे राजे हजर असतील त्यांपैकीं ह्या नाहीं त्या कोणाच्या तरी गळ्यांत माळ घालशील ना ? स्वयंवराकरतां आम्ही राजे लोकांना आमंत्रण द्यावें, आणि कोणचाच राजा राजकन्येला पसंत नाहीं, अशी राजमंडळाची अप्रतिष्ठा व्हावी; असें तर उद्यां होणार नाहींना ? अशी अप्रतिष्ठा झाली असतांना राजकन्येचें घराणें राजपदाला मुकतें—म्हणजे सर्व राजे मिळून आमचें राज्य हिरावून घेतल्याशिवाय राहणार नाहींत—त्याची तुला आठवण आहे ना ?

**रुक्मिणी:**—होय दादा. तें मला सर्व माहीत आहे. माझ्या लग्नाच्या पायीं कुंडिनपुरच्या सिंहासनाचे तुकडे तुकडे व्हावेत, असें मी कांहीं करणार नाहीं. माझ्याकरितां राजमंडळांत दुही होऊन त्यांनीं आपआपसांत लढावें, अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. अमक्या तमक्या राजकन्येच्या स्वयंवराचे वेळीं शेंपन्नास राजे लढाईंत पडले, असल्या गोष्टी त्या राजकन्येच्या स्वरूपवर्गाला भरतें आणतात; पण दादा, असली गर्विष्ठ मी नाहीं, हें तुला माहित आहे.

**रुक्मी:**—ताई, तुझ्या स्वयंवराकरितां बोलावलेले सर्व राजे आले इतकेंच नव्हे, तर न बोलावलेलेहि आले; ही गोष्ट तुझ्या आप्तेष्टांना आनंददायक तर खरीच, पण त्याहूनहि तुझ्या आतांच्या बोलण्यानें मला अधिक आनंद झाला आहे.—दिनेश्वर, आमची ताई म्हणजे सर्व सद्‌गुणांचें माहेरघर आहे, नाहीं ?

**दिनेश्वर:**—हें काय विचारावें ?—पत्रिकेंत ताईसाहेबांच्या चेहऱ्यावर चंद्र पडला आहे तर डोक्यावर गुरु आहे.—बुद्धिस्थान उत्तम आहे.

**रुक्मी:**—रुक्मिणी, कृष्णाच्या येण्यानें तुझी ही बुद्धि चंचल होते कीं काय अशी मला भीति होती, पण आतां काळजी दूर झाली.—चला, दिनेश्वर, आज रात्रींचा मुहूर्त मला बरोबर काढून द्या; म्हणजे सर्व सुरळीत

होईल. [ जातांना स्वगत ] कृष्ण स्वयंवराचें मंडपांतच न येईल, असा बंदोबस्त आज करून टाकतों. [ दिनेश्वर व रुक्मी जातात.

**रुक्मिणी:**––स्नेहलते, दादाच्या बोलण्यावरून लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं; हें बघ, त्या दिनेश्वराला गांठून कांहीं थांग लागतो का पहा. [ स्नेहलता जाते. ] तुझ्या लग्नाच्या पायीं आमच्या घराण्याचा नायनाट होईल, असा धाक दादानें पूर्वी बरेच वेळां घातला होता; पण स्वयंवराचें ठरल्यापासून आज पुन्हां त्या बागुलबोवानें वर डोकें केलें आहे. दादा, माहेरच्या घराचा नाश व्हावा, असें कोणच्या नवऱ्यामुलीला वाटेल ? ज्या वंशांत आपण जन्मास आलों त्या वंशाचा विस्तार व्हावा, असें मला वाटल्यावांचून कसें राहील ? माझ्या बाबांच्या सिंहासनाचा दरारा सर्वांना वाटावा, आमच्या कुंडिनपुरांत सम्राटाचें वैभव नेहमीं खेळत रहावें असें भावाला तेवढें वाटावें आणि बहिणीला वाटूं नये, हें संभवतें काय ?–जी चांगली बहीण नाहीं, ती चांगली बायको होणार नाहीं.–मी माझ्या कृतीनें बाबांना कमीपणा कसा आणीन ?–जी चांगली कन्या असत नाहीं ती चांगली बायकोहि होणार नाहीं.–त्यांना जर समजलें मीं बाबांचें मन दुखविलें, त्यांना जर समजलें मीं आईच्या डोळ्यांतून अश्रुधारा काढल्या, त्यांना जर समजलें कुंडिनपुरच्या वंशच्छेदास मी कारणीभूत झालें,–माझा स्वीकार ते कसा करतील ? सुकन्याच गृहिणीपदाला चढत असतात.

पद १३ ( राग–भीमपलास, ताल–त्रिवट. ‘ तेंडेरे नालमेलगी ’ या चालीवर. )

**स्वकुलतारक सुता; सुवरा वरूनी वाढवी वंश वनिता ॥ धृ० ॥ सुखविला नच जनक, न माता, ऐशी कांता नरकरता ॥ १ ॥**

---

## प्रवेश तिसरा

[ भीष्मक, क्रथकैशिक, कृष्ण, शाल्व, शिशुपाल, रुक्मी बसले आहेत. ]

**भीष्मकः**—शिशुपाल, शाल्व, माझी तुम्हाला हात जोडून अशी विनंति आहे, हें स्वयंवराचें मंगलकार्य तंटयाबखेडयाशिवाय आपण सर्वांनीं मिळून पार पाडावें. मथुरेच्या राज्यांत गंगा-यमुनेच्या काठीं आपण यादवांशीं सतरा वेळां युद्ध केलेंत,-आणि सर्व राजमंडळाचें तसें दुर्दैवच असेल तर आणखीहि सतरा वेळां आपण युद्ध कराल. हा क्षात्रधर्म आहे. त्यासंबंधानें एका पक्षाला असें किंवा दुसऱ्या पक्षाला तसें कांहींच बोलण्याची माझी योग्यता नाहीं. पण आपण आज युद्धाकरितां जमलां नसून लग्नाचे मंगलकार्याकरितां जमला आहां. वंशवृद्धीच्या कार्याचे वेळीं वंशच्छेद कोणाच्यानें पाहवेल ?

पद १४ ( राग-बिहाग, ताल-त्रिवट, 'हमरी मंढेया' या चालीवर. )

**विनति, नृपांनों, ऐका, आतां नाम आपुलें राखा। लग्नीं भांडण करूं हो नका ॥ धृ० ॥ खोटी स्पर्धा सोडुनी, मारा त्या अहंकारा; दुःख नच दे, सुखद खरा वर, द्या यश स्वयंवरा ॥ १ ॥**

म्हणून म्हणतों आतांचा प्रसंग आनंदोत्सवाचा आहे; ह्या वेळीं स्वयंवराचे वेळच्या न्यायनीतीनें वागून-रक्तपात टाळून-आपण सर्वांनीं मला कृतार्थ केलें पाहिजे.

**रुक्मीः**—बाबा, रक्तपात टाळण्याचें आश्वासन शिशुपालाकडून मागण्यापेक्षां कृष्णाकडून मागणें योग्य नाहीं का ? कंसवधापासून रक्तपाताची चटक ज्या हिंस्रपशूला लागली आहे, त्याला प्रथम भग्नदंत केलें पाहिजे, त्याचीं नखें प्रथम काढलीं पाहिजेत. चोराला सोडून सावाला अटकेंत ठेवणें ही राजनीति नव्हे.

**कृष्णः**—माझें सुद्धां तसेंच म्हणणें आहे. मथुरेचा वृद्ध राजा उग्रसेन सांवांतला सांव, सरळांतला सरळ, सत्यशीलांतला सत्यशील, असा नांवाजलेला; तो बंदिवासांत ! त्याला मी बंधमुक्त करून, पुन्हां तुरुंगांत टाकण्याकरितां आलेल्या चोरांचा सतरा वेळा पराजय केला. आजकालचा हा इतिहास महाराजांना विदितच आहे, तेव्हां रक्तपात टाळण्याची विनंति महाराजांनीं प्रथम शिशुपालाला केली—

**शिशुपालः**—रुक्मी, तुझ्या बहिणीच्या स्वयंवराला आम्ही आलों ते पावलोंपावलीं पाणउतारा करून घेण्याकरितां आलों नाहीं.—कृष्णा, मथुरेच्या लढाया अद्याप संपलेल्या नाहींत; यमुनेच्या पाण्यांत यादवांचें रक्त मिसळून लाल झालेली कालिंदी कंसवधाच्या घोर पातकाचें प्रायश्चित्त कृष्णाला मिळालें असें जेव्हां गंगेला कळवील, तेव्हां तो तंटा मिटेल.—महाराज, मथुरेच्या लढाया विदर्भदेशांत लढण्याकरितां आम्हीं आलों नाहीं, आम्हीं आपल्या कन्येच्या स्वयंवराकरितां आलेले आहोंत; आणि सम्राट जरासंध ह्यांच्या राज—मंडळाकडून सम्राटाचा सेनापति हा शिशुपाल आपणास असा सवाल करीत आहे, कीं गोकुळाच्या एका गवळ्याच्या शेजारीं आम्हांला स्वयंवराचे मंडपांत बसवून सर्व राजमंडळाचा अपमान करण्यास आपण कां प्रवृत्त झाला आहां ?

पद १५ ( राग—सोहनी, ताल—झंपा. ‘द्युते सहज आज’ या चालीवर. )

**काजा करिल घात, गवळी कुटिल जात, होतांचि निःपात**
**ना लाजलज्जा ॥ धृ० ॥ आला सरळ धीट, सजला कुशल**
**वीट, अति नीच हा चेट झाला किं राजा ॥ १ ॥**

गवळ्याच्या पंक्तीला बसवून आमची नाचक्की करण्याकरितां कां आम्हाला आमंत्रण दिलेंत ? कृष्णा, बोल, गवळ्याहून अधिक दर्जा तुला कधीं मिळाला आहे काय ?—ए गवळी, गप्प कां बसलास ?—महाराज, गुराखी आणि राजा आपण सारखेच लेखतां काय ?

**रुक्मी:**—बाबा, माझी बहीण शेणी लावण्याकरितां जन्मास आलेली नाहीं. आपण आपल्या कन्येची काळजी करीत नसाल, पण शेणाचें राज्य माझ्या बहिणीला नको आहे. मी सम्राटपदाची आशा धरली आहे, आणि आपल्या आशीर्वादानें व शिशुपालाच्या मदतीनें जरासंधाचे मागून मीच सम्राट होण्यास लायक असें सर्व राजमंडळानें ठरविलें आहे. महाराज, आपल्या वंशाची एक शाखा गगनाला भिडून आपल्या वैभवानें तारा-मंडळाला लाजविणार, आणि दुसरी शाखा शेणामातींत लोळणार, हेंच का आपलें कन्या-वात्सल्य ?—घराण्याचे मुख्य आपण असलां तरी मी सर्व राजमंडळाला आश्वासन दिलें आहे, राजाशिवाय दुसऱ्या कोणालाहि मी स्वयंवराचे मंडपांत बसूं देणार नाहीं. माझ्या आश्वासनाला आपली अनुज्ञा मागण्याकरितां आम्ही आलों आहों. आपलें पुत्रप्रेम जागें करा, आपलें कन्यावात्सल्य सतेज होऊं द्या, घराण्याच्या अभ्युदयाकडे आपली दृष्टि वळवा, स्वयंवराचे मंडपांत बसणारे कन्येच्या दर्जाहून हलक्या पायरीचे असतां कामा नयेत ह्या नियमाची आठवण असूं द्या, आणि मग ह्या गवळ्याला चक्क सांगा, रुक्मिणी गवळ्याची बायको होऊं शकणार नाहीं.

**शाल्वः**—कायरे कृष्णा, सांगना तूं राजा आहेस काय? तुझा बाप राजा आहे काय? तुझा आजा राजा होता काय? तुझ्या आप्तेष्टांकडून लवकरच तुला राज्य मिळावयाचें आहे, म्हणून तूं आज युवराज तरी आहेस काय?

**शिशुपालः**—बोल, तूं गवळी आहेस का राजा आहेस? कर, तुझ्या धंद्याचा उच्चार कर.

**कृष्णः**—महाराज, मी गवळ्यांत लहानाचा मोठा झालों, मी गवळ्यांत नाचलों बागडलों, मी गवळ्यांत पैलवानी करून धष्टपुष्ट झालों; तेव्हां मला गवळी म्हटल्यानें जितका आनंद होतो तितका आनंद सम्राट किंवा देवेंद्र म्हटल्यानेंहि होणार नाहीं.

पद १६ (राग--गौड मल्हार, ताल–त्रिवट. 'पापी दादरवा' या चालीवर.)

सुधा दहिंदुर्धिं विलोका, समजा गोकुळा सुखनि सुखाची,
तरणि तपाची, सकल लोका ॥ धृ० ॥ सदनिं सदनिं सुमनें
भजावें, गोपदासि शिरीं धरावें; गोपाल तो नृपतिसमधि
मिरवे, नमन पुण्यश्लोका ॥ १ ॥

शिशुपाल, आपण मला गवळी म्हणून माझा सन्मानच केला; मला वाईट वाटतें तें एवढेंच, कंसाच्या अनीतीमुळें गवळ्यांचा सहवास सोडून–गोकुळाला मुकून–मला राजांचा धंदा पत्करावा लागला.–महाराज, कंस-वधापासून हा गवळी राजकारभाराचा धंदा करूं लागला आहे; आणि सतरा वेळां ह्या शिशुपालाला युद्धांत पळावयास लावून माझ्या धंद्यांत मीं प्राविण्य मिळविलें आहे. माझा धंदा राजांचा आहे. उत्तम गवळी ज्याप्रमाणें गाईंना सहज वळवितो, त्यांना बांधतो, त्यांचें दूध काढतो, त्याप्रमाणें मी राजांना सन्मार्गावर आणतों, नीतिबंधनांनीं राजांना बांधून ठेवतों, आणि सौख्यशांतीच्या दुधाचे रतीब सर्वांच्या घरीं मी घालतों. मी गवळी म्हणून स्वयंवराला आलों नसून, माझा धंदा राजांचा ह्या नात्यानें रुक्मिणीच्या स्वयंवराला आलों आहे.–तारुण्याबरोबरच प्रसंगोपात ह्रा राजांचा धंदा माझ्या गळ्यांत पडला आहे. ह्या राजांचा धंदा ओळखणारी, ह्या राजांच्या धंद्याला हौसेनें मदत करणारी, आणि ह्या धंद्याच्या आनंदाशीं गृहसुखाचा पूर्ण मिलाफ करणारी बायको मला मिळावी, म्हणून मी रुक्मिणीच्या स्वयंवराला धांवून आलों आहें. महाराज, राजांच्या धंद्यांत ह्या शिशुपालाला, ह्या शाल्वाला मीं सतरा वेळां नादान ठरविलें आहे. ज्यांना राजांचा धंदाच समजत नाहीं अशा आडनांवांच्या राजांच्या गळ्यांत माळ घालून रुक्मिणीला कोणचें राजसुख मिळणार आहे?–आपण नांवानें राजे आहांत; मी धंद्यानें राजा आहें.

क्रथः—कृष्णा, तूं पूर्वींपेक्षांहि आतांच्या भाषणानें मला अधिक प्रिय झाला आहेस. भीष्मक महाराज, श्रीकृष्ण खरा राजा आहे, व आम्ही सर्व नांवाचे राजे आहोंत. तेव्हां शाब्दिक अडचणीमुळें आपण माझ्या मित्राला स्वयंवराचे मंडपांत येण्याची मनाई करूं नये. ही शाब्दिक अडचण मनांत न आणतां आपण पूर्वींच सर्व राजांबरोबर श्रीकृष्णालाहि आमंत्रण पाठवावयाला पाहिजे होतें.

शिशुपालः—भीष्मक महाराज, ह्या गुराख्याची ही बटबट ऐकावयाला मी आलों नाहीं. आपण जर ह्या गुराख्याला स्वयंवराचे मंडपांत येऊं देणार असाल तर आम्ही कोणीहि राजे उद्यां मंडपांत येणार नाहीं. आपण आपल्या गोठ्यांतील बैलांची व रेड्यांची दावण ह्याच्या बरोबर मंडपांत खुशाल लावा, आणि रुक्मिणीला कृष्णाच्याच काय पण पाहिजे त्या बैलाच्या किंवा रेड्याच्या गळ्यांत माळ घालूं द्या. पण राजमंडळाच्या ह्या अपमानाबद्दल स्वयंवराचा मंडप आमच्या सेना वेढतील, आणि रुक्मिणीला माझी बटीक म्हणून जबरदस्तीनें मी कुंडिनपुरांतून घेऊन जाईन.

कृष्णः—सतरा वेळां माझ्या पुढून पळ काढून पुन्हां जबरदस्तीच्या वल्गना माझ्या समोर ! महाराज ह्या दटावणीला आपण भीक घालूं नका. असल्या एक ना दोन शेंकडो मदोन्मत्त बैलांचीं शिंगें धरून मान मुरगळून फेकून देण्याची शक्ति ह्या बाहूंत आहे. मी असेंच समजतों, हें बिनपणाचें स्वयंवर नसून उन्मत्त वृषभांची रग जिरविण्याचा पण रुक्मिणीनें लावला आहे; आणि हा पण जिंकल्यावरच रुक्मिणी माझ्या गळ्यांत माळ घालील.

शाल्वः—महाराज, आतां आम्हाला सांगा—

भीष्मकः—शिशुपाल, शाल्व, कृष्णा,—असे एकेरीवर येऊं—

रुक्मीः—पण बाबा, माझी बहीण राजाशिवाय—

**भीष्मकः**—अरे हो ! तुला तुझ्या बहिणीची काळजी आहे, आणि मला माझ्या मुलीची काळजी नाहीं कीं काय ?---मीं एक तोड काढली आहे. कृष्ण आज राजा नाहीं, हें तुम्हां आम्हां सर्वांना माहीत आहे; पण तो उद्यां राजा झाल्यावांचून राहणार नाहीं, हेंहि तुम्ही आम्ही सर्वजण ओळखून आहों. मग त्याला आज युवराज समजण्यास कोणती हरकत ?

**क्रथः**—युवराज कां ? प्रत्यक्ष राजाच हा माझा मित्र आहे. शाब्दिक अडचणीची कसली एवढी वाटाघाट करीत बसला आहां ?

**कृष्णः**—महाराज, मी राजाहि नाहीं आणि युवराजहि नाहीं. राजा ज्याप्रमाणें कोणच्याना कोणच्या देशाचा असावा लागतो, नुसत्या कल्पनेचा उपयोगीं नाहीं तसाच युवराजहि काल्पनिक असून भागत नाहीं.

**रुक्मीः**---काल्पनिक युवराजाला काल्पनिक राजकन्या माळ घालूं द्या. माझी बहीण काल्पनिक राजकन्या नाहीं.

**क्रथः**---कृष्णा, तूं तरी कसला हट्ट धरून बसला आहेस ? महाराज तुला युवराज समजतात, तूं होय म्हण म्हणजे झालें.

**कृष्णः**---काल्पनिक युवराज मी काय म्हणून होऊं ?

**भीष्मकः**—तसें नव्हे हो. कृष्ण काल्पनिक युवराज नाहीं, मी म्हणतों मथुरेचा युवराज आहे. कंसाला मारल्यानंतर वृद्ध उग्रसेनानें ह्यालाच मथुरेचें राज्य दिलें होतें; पण लोभानें कंसवध केला असा लोकापवाद येऊं नये म्हणून ह्यानें मथुरेचें राजपद नाकारलें.

**कृष्णः**---मथुरेचें राजपदच नव्हे तर युवराजपदहि मीं नाकारलेलें आहे. लोकापवादास्तव मीं राजपद नाकारलें असें नव्हे; तर मथुरेच्या राजलक्ष्मीचा लोभ मला स्वप्नींहि शिवलेला नाहीं. महाराज, मी युवराजहि नाहीं, मी आहें हा असा आहें---राजकाजाचा धंदा करणारा मी गवळी आहें. आप्तेष्टांकडून मला पुढें मागें राज्य मिळण्याचें नसल्यामुळें युवराजहि मी नाहीं. राजकाजांत राजांनाहि मागें सारणारा पुरुष, ह्या नात्यानें आपण मला

स्वयंवराचे मंडपांत येऊं दिलें पाहिजे. मी राजा नसतांनाहि राजकाज करणारा पुरुष ह्या नात्यानें कंसाशीं द्वंद्वयुद्ध करण्याचा अधिकार मला जसा मिळाला, तसाच सतरा वेळां सम्राटाचा मीं पराभव केला म्हणून राजांच्या मालिकेंत स्वयंवराचे वेळीं बसण्याचा स्वयंभू हक्क, मी राजा नसतांनाहि, मला प्राप्त झाला आहे.

**भीष्मकः**—राजाहि नाहीं, युवराजहि नाहीं!–कृष्णा, ऐक माझें ऐक; तुला युवराज म्हणणें सत्यास सोडून नाहीं. उग्रसेन महाराजांच्या मथुरेच्या सिंहासनाचा वारस तूंच आहेस; तेव्हां तुला युवराज म्हणण्याची माझी हौस पुरीव.–कृष्णाला मी मथुरेचा युवराज मानतों; आणि युवराज ह्या नात्यानें त्याला स्वयंवराचे मंडपांत येण्यास आमंत्रण देतों.–माझ्या मुलीच्या स्वयंवराचे वेळीं उदईक सायंकाळीं स्वयंवराचे मंडपांत येण्याची तसदी युवराज श्रीकृष्ण ह्यांनीं—

**कृष्णः**—मी युवराज नाहीं.

**ऋथः**— मित्रा, शद्बाकरितां कसली हुज्जत!

**कृष्णः**—मित्रा, शब्दाकरितां नव्हे.—मीं सतरा वेळां ह्यांचा पराभव केला, ही सिद्ध गोष्ट हे नाकबूल करीत आहेत; तेव्हां स्वयंवराचे अगोदर अठरावे वेळां पराभव करून, राजांचा जन्म पराक्रमापासून होत असतो शब्दापासून होत नसतो, हें सर्व राज–मंडळाला मला दाखवावयाचें आहे.–महाराज, मी राजा नाहीं व युवराजहि नाहीं.

**रुक्मीः**—तूं राजाहि नाहींस आणि युवराजहि नाहींस. बाबा, आपण आपला शेवटचा निर्णय दिलाच आहे, जास्तीची जरुरी नाहीं. तूं राजाहि नाहींस आणि युवराजहि नाहींस. मंडपांत तुला पाय टाकूं देणार नाहीं. उद्यां स्वयंवराचे वेळीं हा रुक्मी आगांतुकाला मंडपाबाहेर अडवून धरील, इतकेंच नव्हे तर सर्व राजमंडळ मंडपाबाहेर यादवांवर तुटून पडेल.

**शिशुपालः**—आणि कंसवधाचा सूड उगविला अशी वर्दी सम्राट जरासंध महाराज ह्यांना प्रथम पाठवून नंतर रुक्मिणीच्या स्वयंवराला सुरुवात होईल.

**कृष्णः**—युद्धाचें हें आव्हान मी आनंदानें स्वीकारीत आहें.—महाराज, आपण स्वयंवराची तयारी ठेवा. उद्यां प्रथम शिशुपालाचा मी पराभव करीन आणि नंतर मंडपांत पाऊल ठेवीन.—शिशुपाला, मीं युद्धाचें आव्हान आनंदानें स्वीकारलें आहे; तूं मात्र अठराव्या वेळीं देखील पलायन करूं नकोस.

[ जाऊं लागतो.

**शिशुपालः**—जा, आगांतुका जा, गांवाबाहेर जा, आणि यादवांचे रेडे स्वयंवराचे मंडपांत बळी देण्याकरितां उद्यां कुंडिनपुराजवळ हांकून घेऊन ये. आगांतुक! आगांतुक! आगांतुक! [ रुक्मी, शिशुपाल, शाल्व जाऊं लागतात.

**क्रथः**—थांबा, जरा थांबा; शाब्दिक अडचणीकरितां लढाई कशाला? राज्यें पराक्रमापासून उत्पन्न होत असतात; त्याप्रमाणें मातापितर किंवा इष्ट-मित्र ह्यांच्यापासूनहि राज्यांची प्राप्ती होत असते.—कृष्णा, कंसवधाच्या वेळीं तुला आनंदानें कडकडून भेटणारा पहिला राजा मी, मथुरेच्या युद्धांत सतरा वेळां आपण होऊन तुला सहाय्य करणारा राजा मी, रुक्मिणीच्या स्वयं-वराचें आमंत्रण तुला दिलेंच पाहिजे म्हणून आग्रह धरून बसणारा राजा मी. मित्रकार्य केवळ शाद्बिक अडचणीमुळें मी कसें बिघडूं देईन? भीष्मक महाराज, राजा असलेल्या ह्या श्रीकृष्णाला स्वयंवराचें आमंत्रण द्या. मीं माझें राज्य ह्या वेळेपासून श्रीकृष्णाला अर्पण केलें आहे. मी ह्या वेळे-पासून राजा नाहीं; श्रीकृष्ण राजा आहे. [ आपल्या मस्तकावरील मुकुट श्रीकृष्णाच्या मस्तकावर ठेवतो. ] भीष्मक महाराज, कृष्णमहाराजांना स्वयंवराचें आमंत्रण द्या.

**भीष्मकः**—श्रीकृष्णमहाराजांना मी माझ्या मुलीच्या स्वयंवराचें आमं-त्रण देतों. शिशुपाल महाराज, आपण राजमंडळाला कळवावें, श्रीकृष्ण

राजा झाला आहे. आणि माझ्या मुलीच्या स्वयंवराचा मंडप आपल्या आगमनानें साजरा करण्यांत किमपिहि आपणास कमीपणा नाहीं.

क्रथः—आणि माझ्यातर्फेंहि सर्व राजमंडळास अशी विनंति करावी, उद्ईक सकाळीं सूर्योदयाबरोबर माझ्या शिबिरांत सिंहासनावर बसलेल्या श्रीकृष्णाला मूर्धाभिषेक व्हावयाचा असून त्या समारंभालाहि सर्व राजमंडळानें येऊन मला कृतार्थ करावें.

शिशुपालः—क्रथकैशिका, ह्या राज्याभिषेकानें तुझ्या मस्तकावर तुझ्या घराण्याचा रक्ताभिषेक होईल; हें पक्कें लक्षांत ठेव.

[ शिशुपाल, शाल्व व रुक्मी जातात.

भीष्मकः—क्रथकैशिका, तुझ्यासारखे महात्मे पृथ्वीच्या पाठीवर आहेत, म्हणून अधर्माला डोकें वर काढतां येत नाहीं.

कृष्णः—महाराज, कंसवधाचे वेळीं ज्या धर्माचें मीं संगोपन केलें, तो धर्म मूर्तिमंत होऊन माझ्या ह्या मित्राचे रूपानें माझा पाठीराखा झाला आहे. मित्रा क्रथकैशिका, पराक्रमाचे जोरावर स्वयंवराचे मंडपांत शिरण्याची माझी इच्छा होती; कारण, मीं कंसवध केला व जरासंधाशीं युद्ध केलें हा अधर्म केला, अशी शिशुपालानें माझी निंदा आरंभिली आहे. अधर्म व धर्म यांमधील निर्णय रणभूमि करते, आणि सुशील कुमारिका प्रीतीच्या छापानें तो निर्णय मुक्रर करतात. पराक्रमाच्या दिव्यांत कांहीं न्यून असेल तर तें प्रथम भरून काढून मग मुख्य न्यायाधीशापुढें उभें रहावें, अशी इच्छा होती. पण क्रथकैशिका, तुझ्या अकृत्रिम स्नेहानें न्यून आतांच भरून काढलें आहे.

पद १७ (राग–परज, ताल–झपताल. ' नाद गडगड सुगड ' या चालीवर.)

**उग्रमुख बहु बिकट धर्म; मन कांपें; परि समाचरितांचि प्रेमांत लोपे ॥ धृ० ॥ कंसा वधीलें, परि लोभ नच त्यांत; घाली स्वसुख-त्याग स्नेहा सुजनांत ॥ १ ॥** [ पडदा

## अंक पहिला समाप्त.

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

[ महाराणी व दोन दासी प्रवेश करितात. ]

**महाराणीः**—कायग, रुक्मिणी येथें अजून कशी आली नाहीं? तिचें न्हाणें अजून चाललें आहे काय?

**पहिली दासीः**—राणीसाहेब, ताईसाहेब श्रीकृष्णाचा अभिषेक पहायला गेल्या होत्या; न्हाणें-माखणें व्हायला जरा उशीर लागला.

**महाराणीः**—मला न सांगतां कशी गेली?

**पहिलीः**—गुप्तपणें गेल्या होत्या—

**दुसरीः**—महाराजांनीं परवानगी दिली, आणि क्रथकैशिक महाराजांनीं तशी नीट व्यवस्थाहि ठेवली होती. आम्ही दोघी बरोबर होतों; आम्ही अभिषेकाच्या वेळीं हजर होतों, हें बाहेर कोणाला कळलें देखील नसेल!

**पहिलीः**—पण, ताईसाहेबांना आतां जर कोणी पाहिलें तर तो तेव्हांच ओळखील त्या राज्याभिषेकाच्या वेळीं हजर होत्या म्हणून.

**महाराणीः**—कसेंग ओळखील?

**दुसरीः**—त्यांच्या सौंदर्यलहरींना इतकी भरती आली आहे ती पूर्णचंद्राच्या दर्शनाशिवाय नव्हे, हें कोणाला समजणार नाहीं? राणीसाहेब, तो अभिषेकाचा समारंभ पहात असतांना ताईसाहेबांच्या चेहऱ्याकडे आम्हीं पाहिलें आणि आम्हांला वाटलें, तेथेंच ताईसाहेबांची दृष्ट काढावी.

**महाराणीः**—आहेच माझी मुलगी तशी सुंदर!

**पहिलीः**—राणीसाहेब, ताईसाहेबांना पाहिल्यावर श्रीकृष्णाची देखील आमच्यासारखीच स्थिति झाली.

पद १८ ( राग--पिलु, ताल--केरवा. 'गलियाके गलिया' या चालीवर. )

**नृपवर रमला, वळविला फिरविला नच रति डोळा; तन्मय दिसला ॥ धृ० ॥ जवळि आला, उभा ठेला, मुका झाला यदुलाल; सौंदर्याला बळी तो पडला, बहुतचि वेळां, तन्मय दिसला ॥ १ ॥**

त्या पहा, ताईसाहेब आल्या; आम्ही म्हणतों तें खोटें कीं खरें, महाराणी-साहेबांनींच पाहून घ्यावें. [ रुक्मिणी येते.

**महाराणीः**—शुक्राच्या चांदणीसारखी शोभते आहे; उगीच नाहीं इतके राजे जमले ते ! हिच्या स्वयंवराचे पायीं कीं नाहीं मोठें युद्ध होणार ! रुक्मिणी, तुला सांगणार होतें--हो काय सांगणार होतें बरें ?--अग हिची दृष्ट आतांच काढा, माझी देखील हिला दृष्ट लागेल !

**रुक्मिणीः**—आई, काय सांगणार होतीस ?

**महाराणीः**—मी काय सांगणार होतें बरें !--बरें आठवलें; मी सांगूं आतां ?--पण सांगून काय जास्ती होणार आहे ? दागिने घालून आणखी काय होणार ?--खरेंच दृष्ट काढा ग.--अशा पहात काय उभ्या राहिलां तुम्ही ! अशा स्तब्ध उभ्या कां ?

**पहिलीः**—नजरबंद झाल्यानें सुचलें नाहीं.

**दुसरीः**—स्वयंवराचे मंडपांत अशीच सर्व राजांची नजरबंद होईल. चित्रासारखे सर्व राजे जागच्या जागीं निश्चल बसतील.

**महाराणीः**—जा दृष्ट काढायचें घेऊन या. पहात काय उभ्या राहिलांत ? तुमचीच दृष्ट लागेल.

**दासीः**—आज्ञा महाराणीसाहेब. [ दासी जातात.

**रुक्मिणीः**—आई, मला काय सांगणार होतीस ?

**महाराणीः**—होय, काय बरें सांगणार होतें ? हो हो, अग स्वयंवराला अजून प्रहर दोन प्रहर अवकाश आहे; एव्हांशींच हे दागिने अंगावर

घालूं नकोस म्हणून सांगणार होतें.--तुला दृष्ट लागेलना ? आज सकाळच्या अभिषेकाच्या समारंभाचे वेळीं तुला बघ दृष्ट लागायची वेळ आली होती !

**पद १९** ( राग--खमाज, ताल--पंजाबी. 'निंदिया जगाये डारीरे' या चालीवर.)

**दिपले नरेश, लागेल दृष्ट बाळे; रूप उसळलें, विकसविलें; दिपले, लागेल दृष्ट बाळे ॥ धृ० ॥ नोहें खोटें, नयनसुख दाटे; अतिशयें पिसळले डोळे ॥ १ ॥**

आणि हें बघ रुक्मिणी, स्वयंवराचे वेळींहि इतके दागिने नको घालूं अंगावर !

**रुक्मिणीः**—आई, मी अगदीं थोडे दागिने घातले आहेत, नाहींत म्हटलें तरी चालेल.

**महाराणीः**—हो खरेंच, तूं नेहमींचे देखील घातले नाहींस ! मला वाटलें होतें तूं पुष्कळ दागिने घातले असावेस, म्हणून इतकी सुरेख दिसते आहेस !--नको ग बाळे, एकहि दागिना अंगावर घालूं नकोस, तुला दृष्टच लागेल !--ते सगळे राजे मेले तुझ्याकडे एकसारखे टक लावून पाहूं लागतील.--नको एक देखील दागिना नको.--मेल्यांची दृष्ट लागेल.

**रुक्मिणीः**—नाहीं आई, कांहीं व्हायचें नाहीं. आई तुला आपलें वाटतें झालें मी सर्वांहून सुंदर आहें म्हणून. पण खरें सांगूं का आई, तो नंदकुमार मंडपांत आल्यावर मजकडे कोणी देखील पहाणार नाहीं. सर्वांचे डोळे त्या रम्य मूर्तीत खिळून राहतील, आणि मला दृष्ट लागायला कोणाला दृष्टिच शिल्लक रहाणार नाहीं. आज सकाळीं—

**पद २०** ( राग—पहाडी, ताल—धुमाळी, 'बोरिदा चित लागो' या चालीवर. )

**एकला नयनाला विषय तो झाला ॥ धृ० ॥ सकलहि स्थानीं अवघा भरला, न बघत इतरा डोळा ॥ १ ॥ अवयव सगळे नयनीं जमले, यदुवर दिसतां मजला ॥ २ ॥**

**महाराणीः**—अग तें खरें, पण शिशुपाल वगैरे गिधाडें बसलीं आहे-तना टपून ? त्यांची जर दृष्ट लागली—आणि हें बघ तुला अशी पाहिल्या-बर रणें माजतील रणें ! म्हणून म्हणतें स्वयंवराचे वेळीं अगदीं साधी—वेडीविद्री—विद्रूप—दिसलीस तरी चालेल !—पण मी हें काय सांगतें आहें ? तुला किती शिकविलें तरी तुला विद्रूप व्हायलाच यावयाचें नाहीं.—मला मोठी काळजी पडली आहे, तुझें रूप कसें झांकून ठेवावें ? काय करावें बरें ? दुष्टांची नजरच तुझ्यावर पडतां कामा नये.

**रुक्मिणीः**—आई, त्याची नको काळजी. त्यांचें रूपच असें आहे, दुष्टांनीं त्यांना पाहिलें म्हणजे त्यांचा दुष्टपणाच नाहींसा होतो.—त्यांच्यापुढें माझें रूप काय ? ज्या स्वरूपामुळें शिशुपालाचा दुष्टपणा वाढत जातो, ती मी खरोखर सुंदरच नव्हे. आई, आम्हा बायकांचें सौंदर्य जर पुरुषांना दुष्ट करूं लागलें तर आम्हां बायकांना सुंदर म्हणण्यापेक्षां कुरूपच म्हटलें पाहिजे. सौंदर्य तें खरें—त्या नंदकुमाराचें सौंदर्य—तें खरें सौंदर्य. त्यांना पाहिलें म्हणजे मनांतला वैरभावच नाहींसा होतो, आणि जगांत कोणी दुष्ट म्हणून आहेत ह्याची आठवणच रहात नाहीं. कोणाला त्यांच्याशीं वैर करावेंसें वाटेल ? त्यांचें दर्शन घडल्यावर कोणाच्या हातांतलीं शस्त्रास्त्रें गळून पडणार नाहींत ? त्यांचा आवाज ऐकल्यावर कोणाची मान त्यांच्या-पुढें लवल्याशिवाय राहील ? त्यांनीं प्रेमानें व प्रसन्न मुद्रेनें पाहिल्यावर त्यांच्याच सहवासांत सर्व काळ घालवावा असें कोणाला वाटणार नाहीं ? शत्रूंना मित्र करणारें, तसलें खरें सौंदर्य त्यांचें !

**पद २१** ( राग—कॉफी, ताल—त्रिवट. ‘ कोन तऱ्हासे तुम फेंकत ’ या चालीवर. )

**रूप—बली तो नर—शार्दुल साचा, क्षणीं विनाशित रिपुभाव मनिंचा ॥ धृ० ॥ खला देखी, मग भूल फेंकी, नयन—भाषण मनासि जिंकी, क्षणीं विनाशित स्वभाव रिपुचा ॥ १ ॥**

आई, तूं जर मजप्रमाणें राज्याभिषेकाच्या वेळीं त्यांना डोळे भरून पाहिलें असतेंस, तर स्वयंवराचे वेळापूर्वी, स्वयंवराचे वेळीं, व स्वयंवर झाल्यानंतरहि माझ्या लग्नाचे पायीं कोठेंहि रक्तपात व्हावयाचा नाहीं, असें माझ्याप्रमाणें तुलाहि खात्रीनें वाटलें असतें.

**महाराणी:**—नको बाळे, फार नको बोलूंस.—तूं जशी सुंदर आहेस तशी शहाणीहि आहेस. मला आतां भीति वाटूं लागली आहे, स्वयंवराचे वेळीं तुझ्या सौंदर्यापेक्षां तुझ्या शहाणपणालाच अधिक दृष्ट लागेल!—बाळे, हें लग्न आटपून जाईतों तूं कोणाशीं बोलूं नकोस.—माझी बाळी शहाणी आहे; त्या रुक्मीला म्हणावें हिच्यापासून तरी कांहीं शहाणपण शीक.—शहाणी आहे हो मुलगी शहाणी आहे! [ रुक्मी येतो.

**रुक्मी:**—आली आहे शहाणी! शहाणी आहे शहाणी!—आई तूं हिला अशी शेफारून ठेवली आहेस!—हिच्या मूर्खपणानें मथुरेचें युद्ध कुंडिनपुरांत होण्याची वेळ आली आहे. कायग रुक्मिणी, तुला कृष्णाच्या अभिषेकाला जायला कोणी सांगितलें?

**महाराणी:**—मीं नाहीं हो सांगितलें; पण त्यांत काय बिघडलें?

**रुक्मी:**—सांग ना कोणीं सांगितलें?

**रुक्मिणी:**—क्रथकैशिक महाराजांनीं आग्रह केला, बाबा बरें म्हणाले, आणि मीहि पूर्वी कधीं राज्याभिषेक पाहिला नव्हता,—

**रुक्मी:**—राज्याभिषेक पाहिला नव्हता! भिकाऱ्याचीच मुलगी कीं नाहीं! राज्याभिषेक पाहिलास, आतां रुधिराभिषेक पहावा लागेल.

**रुक्मिणी:**—कपाळीं असलें तर वीरकन्येनें तेंहि पाहिलें पाहिजे.

**रुक्मी:**—पाहिलेंस आई, कशी चुरुचुरु बोलते आहे ती? तो कृष्ण येथें आल्यानें हिला वाटलें आहे सर्व कांहीं हिच्यासारखेंच झालें! आई, हिचें स्वयंवर आरंभिलें हीच चूक झाली.—शिशुपालालाच हिला देऊन टाकावयाला पाहिजे होती.—रुक्मिणी, विसरूं नकोस, बाबा जर आड आले

नसते तर आईनें आणि मी दोघांनीं मिळून ह्या पूर्वींच शिशुपालाशीं तुझें लग्न लावून टाकलें असतें.

**रुक्मिणीः**—दादा, असें कां म्हणतोस? बाबा तरी तुझ्यापुढें काय करणार आहेत? बाबांच्या हट्टामुळें नव्हे, तर माझ्या सुदैवानें कंसवध झाला आणि जरासंधाचा पराभव झाला, म्हणून तुझें साधलें नाहीं. नाहीं तर शिशुपाल दाखवतील तीच पूर्वदिशा तुम्हाआम्हांला कबूल करणें भाग होतें. कंसवधानें मथुरेचा वृद्ध राजा उग्रसेन तेवढा कैदेंतून सुटला असें नव्हे, तर सर्वच वृद्ध राजांचा जाच कमी झाला; आणि सर्व तरुण कन्यांना स्वतःच्या मातापितरांचा आश्रय मिळाला. कंसवध जर झाला नसता, जरासंधाचा पराभव जर झाला नसता, मथुरेच्या युद्धांत यादवांची जर सरशी झाली नसती, तर सर्व राजकन्यांना त्यांच्या आईबापांचें आश्रय-स्थान बळजोरीमुळें सोडावें लागलें असतें, परंपरागत धर्माप्रमाणें त्यांचीं लग्नें न लागतां कंसाच्या किंवा शिशुपालाच्या पापी नेत्रसंकेताप्रमाणें भल-त्याच्याच गळयांत राजकन्यांना माळा घालाव्या लागल्या असत्या, आणि जरासंधाचा लोभ संपादन करण्याकरतां भावांनीं आपल्या बहिणींचें सौंदर्य विकलें असतें. तेव्हां म्हणतें दादा, बाबा नाहीं तुझ्या बेताचे आड आले तर कंसवध आड आला—

**रुक्मीः**—कंसवध आड आला, तर रुक्मिणी, आज ती आडकाठी कृष्णवधानें काढली जाईल, समजलीस? तुला कृष्ण नवरा पाहिजे अं!

**पद २२** (राग—सारंग—देस—मिश्र, ताल—त्रिवट. 'पाहूं कोण धीट' या चालीवर.)

**धष्टपुष्ट नष्ट नवरडा, मारुनि ऐसा, अर्पिनगे रणनायक कंसा,**
**कृष्णाचा बली मी, नच मेंढा जणु रेडा ॥ धृ० ॥ तर्पण**
**त्याच्या करीन रुधिरें; जय येइल सम्राटा मम करें; नरकीं**
**त्या कृष्णा देखा आजि, ठरविन यदुसिं कुतरडा वेडा ॥ १ ॥**

कृष्णाला राज्याभिषेक झाल्यानें त्याचें बल वाढलें, असें थोडेंच आहे? ह्या

राज्याभिषेकानें उद्यांचें मरण आज आणलें इतकेंच.–[ दुंदुभि वाजतात ] ऐक रुक्मिणी, ऐक, कृष्णवधाच्या तयारीच्या ह्या दुंदुभि ऐक.–राज्याभिषेक पाहण्याला तूं गेलीस, त्याचा हा परिणाम ऐक.–ह्या दुंदुभि कसल्या म्हणून तूं समजलीस ? शिशुपाल, शाल्व व सम्राट जरासंध ह्यांच्या सेना आपापल्या शिबिरांतून बाहेर पडल्याच्या ह्या दुंदुभि आहेत.–राजमंडळाची सेना तयार झाली आणि राजमंडळाचा निरोप बाबांना कळविण्याकरितां मी पुढें आलों.–ऐक रुक्मिणी, ह्या दुंदुभि ऐक.–तुझ्या स्वयंवराचा मंडप राजमंडळाची सेना क्षणांत वेढून टाकील, आणि तूं किंवा बाबांनीं समंजसपणाचें उत्तर न दिल्यास स्वयंवराचे मुहूर्ताचे आधीं एक प्रहर स्वयंवराचा मंडप उध्वस्त करण्यांत येईल,–ऐक, रुक्मिणी, ह्या दुंदुभि ऐक आणि मी विचारतों त्या प्रश्नाला शहाणपणाचें उत्तर दे. आई ही शहाणी आहेना ! पाहूं शहाणपणाचें काय उत्तर देते ही !

**महाराणीः**—अरे ही शहाणी आहे हो शहाणी.–विचारना तुला काय विचारावयाचें तें ? उगीच नुसता धाकच काय दाखवितोस अगोदर !

**रुक्मिणीः**—दाखवूं दे त्याला अगोदर लागेल तितका धाक दाखवूं दे.–धाक दाखवून झाल्यावर सावकाशपणानें दादा, तूं प्रश्न विचार, आणि संथपणानें मी काय सांगावयाचें तें सांगेन.

**रुक्मीः**—ताई, आतां संथपणा कोठचा ? ऐक, रुक्मिणी, ह्या दुंदुभि ऐक.–ह्या दुंदुभि विचारीत आहेत, राजमंडळाची सर्व सेना विचारीत आहे, शिशुपाल, शाल्व, जरासंध वगैरे बलाढ्य राजे विचारीत आहेत, सम्राटाचा प्रथम सेनापति होऊन मागाहून सम्राटपदाला चढून माझ्या ह्या मातेचें तुझ्या माझ्या आईबापांचें नांव अजरामर करूं इच्छिणारा हा रुक्मी आपल्या बहिणीला विचारीत आहे,–ऐक ह्या दुंदुभीचा प्रश्न ऐक–विदर्भदेशाची अब्रू, रुक्मिणी, आज तूं राखणार कीं नाहीं ?

**महाराणीः**—आमची बेअब्रू आज कशीरे होणार !

**रुक्मीः**—ह्या दुंदुभि सांगत आहेत कशी होणार तें! रुक्मिणीनें शिशुपालालाच माळ घालण्याचें वचन आतां मला दिलें पाहिजे, म्हणजे आमचें स्वयंवर पार पडून आमची अब्रू राहील. रुक्मिणी जर तसें करणार नसेल तर एक दोन घटकेंत स्वयंवराचे मंडपाचा विध्वंस होईल.—सांग, रुक्मिणी, तूं शिशुपालला माळ घालणार का स्वयंवराच्या मंडपाचा विध्वंस करून घेणार?

**रुक्मिणीः**—दादा, तूं मनांत आणलेंस तर स्वयंवराच्या मंडपाचा विध्वंस होऊं देणार नाहींस. विदर्भदेशाचें शौर्य इतकें जाज्वल्य आहे कीं, माझ्या स्वयंवराचा मंडप जाळण्यापोळण्याच्या शिशुपालाच्या वल्गना माझा दादा क्षणांत फोल करून सोडील. मंडपाचा विध्वंस होण्यानें आमच्या घराण्याची होणारी बेअब्रू वांचविण्याचें सामर्थ्य, दादा, तुझ्या मनगटांत असतांना, मंडपांचें संरक्षण कसें करावें, हें मला कां विचारतोस?

**रुक्मीः**—तुला विचारतों ह्याचें कारण, शिशुपाल माझा मित्र आहे, माझा दुसरा प्राण आहे, आणि ह्या रुक्मीच्या मनगटांतील शक्ति मित्रकार्य करून घराण्याचें वैभव शिखरास पोंचीव असें मला सांगत आहे म्हणून.

**रुक्मिणीः**—म्हणजे दादा, तूं होऊन स्वतःच्या हातांनीं स्वतःच्या बहिणीचा लग्नमंडप पाडणार असेंच ना?

**रुक्मीः**—हो असेंच, अगदीं असेंच.—मी आणि शिशुपाल दोघे मिळून तुझा लग्नमंडप पाडणार—पोळणार—जाळणार—हो अगदीं असेंच.—सांग रुक्मिणी, आतां सांग, तुझे हात शिशुपालाच्या गळ्यांत माळ घालण्यास तयार आहेत का माझे पाय लग्नाची मुहूर्तमेढ लाथाडून टाकूं देत?

**रुक्मिणीः**—मग दादा, माझें स्वयंवर आरंभलेंत तरी कशाला? स्वयंवर करूं देणें न देणें आईबाप व घराण्यांतील कर्ते पुरुष ह्यांच्या मर्जीवर अवलंबून असतें. स्वयंवर आरंभिल्यानें घराण्याची प्रतिष्ठा कमी न होतां मी अधिक सुखी होईन, म्हणूनच माझें स्वयंवर आरंभिलेंत ना?

**रुक्मीः**—होय, नाहीं कोण म्हणतो ? पण कृष्ण आल्यानें घराण्याच प्रतिष्ठा जाऊं लागली–जाऊं लागली कसली–पार गेली !–घराण्याची प्रतिष्ट प्रथम मी पाहणार–आणि ताई तूंहि घराण्याच्या प्रतिष्ठेवर प्रथम नज ठेविली पाहिजेस; आणि घराण्याचे प्रतिष्ठेकरितां शिशुपालालाच वर पाहिजेस.–ऐक दुंदुभि ऐक–ह्या दुंदुभि सर्व विश्वाला जाहीर करीत आहेत विदर्भदेशाची प्रतिष्ठा लयाला गेली, विदर्भदेशाच्या अब्रूला कलंक लागल आणि विदर्भदेशाचें राजघराणें कवडीमोल झालें—

[ भीष्मक व क्रथकैशिक येतात

**भीष्मकः**—कोण म्हणतो विदर्भदेशाचें राजघराणें कवडीमोल झालं म्हणून ? कोण ? कोण ?–तूं रुक्मी !–विदर्भदेशाचा युवराज–ह्या भीष्मकाच मुलगा ? रुक्मी, तुझी वाचा असे अभद्र शब्द उच्चारूं शकली कशी ?

**रुक्मीः**—बाबा, मीं तसें बोलूं नको तर काय करूं ?–मी आपण होऊन तसें बोलत नसून ह्या रणदुंदुभि मला तसें बोलायला लावीत आहेत.–ऐका बाबा, ह्या रणदुंदुभि ऐका.–राजमंडळाची सेना लग्नमंडपाला गराड घालण्यास निघाली आहे, आणि शिशुपालालाच वरण्याचें वचन जर आत रुक्मिणीनें दिलें नाहीं, तर लग्नमंडपाबरोबरच तुमच्या राजवंशाची प्रतिष्ठ जाळून टाकण्याचा त्यांचा बेत आहे. —ऐका, बाबा, ह्या रणदुंदुभि ऐका आणि मग मला दोष द्या.

**भीष्मकः**— माझ्या राजवंशाची प्रतिष्ठा कशी राखायची हें मल समजतें. माझ्या मस्तकावरील राजमुकुट तुझ्या मस्तकावर चढेपर्यंत तुल त्याची काळजी करण्याचें कारण नाहीं, व रुक्मिणीलाहि असेंच कर तसेंच क म्हणून धाक दाखविण्याची जरुरी नाहीं.

**क्रथः**—रुक्मी, कंसवधापूर्वींचे दिवस आतां उरले नाहींत; शिवाय श्रीकृष्ण आज मथुरेस नसून कुंडिनपुरास आहेत, हेंहि विसरूं नकोस.

**रुक्मीः**—तो गवळी येथल्या गाई चारीत असला काय किंवा गोकुळाच्या गाई चारीत असला काय, दोन्ही आम्हांला सारखेंच !—क्रथकैशिक महाराज, ह्या दुंदुभि प्रथम ऐका, आणि मग काय आदेश मला करावयाचा तो करा.—ऐका, कान लावून नीट ह्या दुंदुभि ऐका.

**भीष्मकः**—रुक्मी, ह्या दुंदुभि यादवसेनेच्या आहेत; क्रथकैशिकाची सेना व विदर्भदेशच्या सेना चक्रव्यूह रचून लग्नमंडपाच्या रक्षणाकरितां उभ्या ठाकल्या आहेत, हें सर्वांना कळण्याकरितां हीं रणवाद्यें वाजत आहेत; समजलास रुक्मी ?

**रुक्मिणीः**—हें खरेंना बाबा, हें खरें ना ?

**क्रथः**—हें सर्व खरें; लग्नमंडपाचेंच केवळ नव्हे, तर स्वयंवर संपल्यावर वधूवरांचें संरक्षण करण्याकरितां यादवसेना, माझी सेना व विदर्भसेना कडेकोट बंदोबस्त करून सज्ज उभी आहे.

**रुक्मिणीः**—महालक्ष्मी नवसास पावली, दादा.

**महाराणीः**—माझ्या मुलीचें नशीब तसेंच आहे बलवत्तर !

**भीष्मकः**—रुक्मी, या दुंदुभि नीट ऐक, आणि शिशुपालाला माझा उलट निरोप कळीव, माझ्या मुलीचें स्वयंवर मीं आरंभिलें आहे, आणि तें शेवटास नेण्याचें सामर्थ्य माझ्या अंगांत आहे.

पद २३ ( राग—मालकंस, ताल—झपताल; 'सा सुंदर बदन' या चालीवर. )

**जा, भय न मम मना; मंडप सबल, समरानल—महाज्वालें**
**जळेना ॥ धृ० ॥ शिशुपाल—वैराग्नि पेटला, भेटला जणु**
**कृष्णबल—सागर तयाला ॥ १ ॥** [ रुक्मी जातो.

बाळे, या क्रथकैशिकाच्या व यादवांच्या साहाय्यानें तुझें स्वयंवर पार पाडण्यास मी समर्थ आहें. सर्व आप्तेष्टांच्या सल्ल्यानें बापानें मुलीला योग्य वर पाहून तरी द्यावा, किंवा आईबापांचें एकमत होत नसल्यास घराण्याचे

प्रतिष्ठेला धरून बोलावलेल्या नवरदेवांत पाहिजे त्याला माळ घालण्याच परवानगी तरी मुलीला द्यावी, असा विवाहाचा निर्बंध आहे. तुझ्य लग्नाच्या पायीं आम्हां बापलेकांतच प्रथम दुफळी झाली; तेव्हां स्वयंवराचे वेळीं पाहिजे त्याला माळ घालण्याची मोकळीक स्वयंवराचे निर्बंधानें तुल मिळाली आहे. आमंत्रण कोणाला करावयाचें ह्या संबंधाचीहि कटक क्रथकैशिकाच्या औदार्यानें मिटली आहे. तेव्हां आतां तुझी तूं मुखत्या आहेस. तुझ्या स्वयंवराचें आम्ही रक्षण करूं; आणि तूं ज्याला वरशी त्याचा पक्षहि आम्ही स्वीकारूं. पण तूं जर कोणाला स्वयंवराचे मंडपां वरिलें नाहींस तर मात्र तुझी अखत्यारी संपेल; आणि नंतर आम्ही ज्याल देऊं त्याच्याशीं तुला लग्न करावें लागेल.—चला, क्रथकैशिक महाराज आपण पुढील उद्योगास लागूं. बाळे, महालक्ष्मीचें घटका दोन घटक पूजन-मनन कर, म्हणजे ज्या योगानें आमच्या घराण्याची प्रतिष्ठा वाढे व तुझें कल्याण होईल, अशीच बुद्धि महालक्ष्मी स्वयंवराचे वेळीं तुल देईल. [ भीष्मक, क्रथकैशिक व महाराणी जातात

**रुक्मिणी:**—बाबा, विदर्भदेशाची व आपल्या घराण्याची प्रतिष्ठ वाढावी अशीच जगदंबेची प्रार्थना आजपर्यंत मी करीत आलें आहें, आणि आतां आपल्या आज्ञेप्रमाणें जगदंबेपाशीं हेंच मागावयाचें आहे.

**पद २४** ( राग—तिलककामोद, ताल—रूपक. 'सुरसंगतरागविद्या' या चालीवर.

**मम सुखाची ठेव, देवा, तुम्हापाशीं ठेवा; ती स्मृतिवरि लिहावी, मम कारणें, जनकनांवा ।। धृ० ।। अखिलहि खर्चचि करि आप्त-देव-धर्म-वैभवीं; वर अजि ह्या असा मला द्यावा ।। १ ।।** [ पडदा

## प्रवेश दुसरा.

[ दिनेश्वर व स्नेहलता येतात. ]

**दिनेश्वर:**—स्नेहलते, काय प्रश्न आहे ?

**स्नेहलता:**—शिशुपाल स्वयंवराला येणार नाहींत,—

**दिनेश्वर:**—तें सांगूं नकोस; मी ऐकणार नाहीं—ऐकणार नाहीं काय, ऐकलेंच नाहीं. शिशुपाल येणार नाहीं, हें न सांगतां प्रश्न विचार.—काय म्हणतेस ?

**स्नेहलता:**—शिशुपाल स्वयंवराला येणार नाहींत,—

**दिनेश्वर:**—तें तूं सांगूं नकोस—मी ऐकत नाहीं, ऐकणार नाहीं, ऐकलें नाहीं, शिशुपाल येणार नाहीं, हें न सांगतां प्रश्न विचार.

**स्नेहलता:**—शिशुपाल स्वयंवराला येणार नाहीं, तेव्हां रुक्मिणी कोणाला माळ घालील ?

**दिनेश्वर:**—हां आतां बरोबर बोललीस. मीं प्रश्न तेवढा ऐकला ! कसें म्हणतेस ? रुक्मिणी कोणाला माळ घालील, हा प्रश्न पाहूं ?—हा प्रश्न पहायला रुक्मिणीचा हात प्रथम पाहिला पाहिजे.—चालेल रुक्मिणीच्या ऐवजीं तुझा हात पाहिला तरी चालेल. ( तिचा हात पाहून ) कसें सामुद्रिक अगदीं बरोबर येतें !—तुझ्या हातावर प्रतिस्पर्धी नवऱ्याच्या दोन रेषा नाहींत, एकाच नवऱ्याची रेषा आहे; ह्यावरून मी अनुमान करितों कीं आतांच्या स्वयंवराला शिशुपाल येणार नाहीं—

**स्नेहलता:**—पण मीं तें प्रथमच तुम्हांला सांगितलें—

**दिनेश्वर:**—तूं सांगितलें असशील, पण मीं कोठें ऐकलें होतें ?—हें ज्ञान मला गणितानें झालें, ज्योतिषानें मला सांगितलें, सामुद्रिकावरून मीं ताडलें. शिशुपाल येणार नाहीं.—हें बरोबर आलें.

**स्नेहलता:**—पण मीं तें प्रथमच तुम्हांला सांगितलें—

**दिनेश्वर:**—सांगून काय उपयोग ? मीं ज्योतिषावरून तें काढलें आहे; कबूल केलें पाहिजे बरोबर आहे म्हणून.—आतांच्या वेळेवरून प्रश्न पहातां असें ठरतें कीं साफ शिशुपाल येणार नाहीं.—शिशुपाल स्पष्ट येणार नाहीं.—पाहूं हात.—एकच नवरा आहे.—शिशुपाल येत नाहीं, हें माझें भविष्य वज्रलेप झालें.—काय येतो आहे शिशुपाल ?—म्हणावें, कसा येतो पाहूं—शिशुपाल येत नाहीं, येत नाहीं. सामुद्रिकहि तेंच सांगतें; ग्रहहि तेंच बोलतात.—शिशुपाल येत नाहीं,—येत नाहीं,—हें ठरलें.—आतां मला सांग, माझ्या भविष्यावर तुझा पूर्ण विश्वास बसलाना ?

**स्नेहलता:**—पण मीं अगोदरच हें सांगितलें होतें.

**दिनेश्वर:**—पुन्हां पुन्हां मला तेंच सांगतेस ?—कोण अशी तूं मोठी, माझ्या ज्योतिषावर विश्वास न बसायला !—मीं ज्योतिषानें सिद्ध केलें असतां नाहीं म्हणतेस ? पुन्हां माझ्यापुढें बटबट ?—असल्या पाखंड्यांना कधींहि भविष्य सांगूं नये.—तुमचा देवावर विश्वास नाहीं, तुमचा धर्मावर विश्वास नाहीं, तुमचा शनीवर विश्वास नाहीं; तुमचा मंगळावर विश्वास नाहीं, तुमचा गुरूवर विश्वास नाहीं; आकाशांत राहूकेतूंचें ग्रहण सूर्यबिंबाला न लागतां जेव्हां प्रत्यक्ष तुम्हाला लागेल आणि जेव्हां तुमचीं तोंडें काळीं ठिक्कर पडतील, तेव्हांच तुमचा विश्वास बसेल.

**स्नेहलता:**—असें काय रागावता ! माझा विश्वास आहे हो.—मला रुक्मिणीनें सांगितलें, श्रीकृष्णाचेच गळयांत तिची माळ पडायला स्वयंवराचें मंडपांत तिनें कोणच्या दरवाजानें प्रवेश करावा तें ताबडतोब आपणाला विचारून ये म्हणून. तेव्हां प्रश्न विचारतें हो.

**दिनेश्वर:**—राजकन्येला म्हणावें ज्योतिषावर जिचा विश्वास आहे अशी मैत्रीण प्रश्न विचारायला पाठीव, म्हणजे मग मी उत्तर देईन.

**स्नेहलता:**—माझा पूर्ण विश्वास आहे.

दिनेश्वरः—मग शिशुपाल येणार नाहीं हें प्रश्न पाहून मीं सांगितलें होय ना ?

स्नेहलताः—होय, आपण इतकें बिनचूक भविष्य करीत असतां, हेंहि मी रुक्मिणीला सांगेन.

दिनेश्वरः—आतां वाटेवर आलीस.—असें सरळ प्रथमपासून बोलली असतीस तर ! शिशुपाल येणार नाहीं हें तर मीं वर्तविलें.—पाहूं हात.—स्नेहलते, तुझ्या हातावर तर चक्रवर्तीपदाचीं सर्व राजचिन्हें आहेत !—तूं कोणा तरी सम्राटाची बायको झाली पाहिजेस.—संभाळ हो; जरासंध महाराजांच्या नजरेस पडूं नकोस, नाहीं तर त्यांच्या म्हातारपणाची तूंच पट्टराणी होऊन रुक्मिणीच्या ऐवजीं तुझेंच आज स्वयंवर व्हावयाचें !

स्नेहलताः—अहो, मी माझ्याबद्दलचें भविष्य विचारीत नाहीं, तर रुक्मिणीचा व श्रीकृष्णाचा विवाह होईल कीं नाहीं, म्हणून विचारीत आहें.

दिनेश्वरः—हा प्रश्न मी विसरलोंच ! श्रीकृष्णाला रुक्मिणी माळ घालणार ना ? हाच तुझा प्रश्न, होय ना ?

स्नेहलताः—होय, हाच प्रश्न.

दिनेश्वरः—आतां नीट ध्यानांत ठेव, विसरूं नकोस. तुझा हात पाहून वर्तिवलें, शिशुपाल मंडपांत येत नाहीं. होय ना, वर्तिवलें ना ? का विसरलीस ?

स्नेहलताः—होय वर्तिवलेंत; मला कबूल आहे.

दिनेश्वरः—विसरली नाहींस ना ?

स्नेहलताः—नाहीं विसरलें.

दिनेश्वरः—तुझा हात पाहून मीं असें वर्तिवलें—तुझ्या हातावर चक्रवर्ती चिन्हें आहेत, त्यावरून मी असें वर्तिवतों,—रुक्मिणीला चक्रवर्ती नवरा मिळाला पाहिजे.—काय ग, जरासंधाला रुक्मिणी माळ घालणार आहे काय ?

**स्नेहलता:**—नाहीं, श्रीकृष्णाला घालणार आहे.

**दिनेश्वर:**—अग, तें तूं अगोदर सांगूं नकोस; ज्योतिषानें काढतों.—चक्रवर्ती नाहीं तर चक्रधारी तरी नवरा मिळाला पाहिजे.—श्रीकृष्ण चक्र धारण करितो; तेंच त्याचें शस्त्र—साफ सांग रुक्मिणीला, श्रीकृष्णच नवरा आज मिळणार, असें मीं भविष्य वर्तिवलें आहे.

**स्नेहलता:**—( नमस्कार करून ) येतें मी, आपला आशीर्वाद रुक्मिणीला कळवितें.

**दिनेश्वर:**—स्नेहलते, हें काय ! अरे बापरे, हें काय ?

**स्नेहलता:**—काय झालें ? काय झालें ? इतके घाबरलां कां ?

**दिनेश्वर:**—पुन्हां नमस्कार कर पाहूं; पुन्हां नमस्कार कर.

**स्नेहलता:**—( नमस्कार करून ) काय झालें ! कां घाबरलां ?

**दिनेश्वर:**—सगळें खोटें ठरलें, माझें भविष्य खोटें ठरलें.

**स्नेहलता:**—काय झालें ?

**दिनेश्वर:**—अग, मीं तुझें मस्तक इतक्या वेळ पाहिलें नव्हतें, सगळें खोटें ठरणार.—पुन्हां नमस्कार कर पाहूं ?

**स्नेहलता:**—( नमस्कार करून ) काय झालें ?

**दिनेश्वर:**—अग तुझ्या कपाळाची कवटी उलटी लागली आहे ! तरी म्हटलें ही चक्रवर्तीची पट्टराणी होणार कशी, आणि अशी सुलक्षणी अशी दरिद्री कां ? कपाळाची कवटी उलटी लागली आहे !—माझें भविष्य उलटें-पालटें होणार; तुझ्या कपाळाची कवटी उलटी लागली आहे ! [ चंद्रेश्वर येतो.

**चंद्रेश्वर:**—बाबा, बाबा, शिशुपाल महाराज स्वयंवराचे मंडपाजवळ आले; लवकर चला; शिशुपाल महाराज आतां इतक्यांत मंडपांत येतील.

**दिनेश्वर:**—शिशुपाल महाराज मंडपांत यावयाचेच; आलेच पाहिजेत; आलेच आहेत. हिच्या कपाळाची कवटी उलटी लागली आहे ! शिशुपाल येणार नाहींत म्हणून मीं भविष्य केलें; ते आले.—कवटी उलटी ! जा सर्व

भविष्य उलथेंपालथें व्हावयाचें.—जा, तूं जा भुकाट्यानें—कपाळाची कवटी उलटी !

**स्नेहलता:**—( स्वगत ) मेल्याच्या कपाळाची कवटी उलटी आहे. हात दाखवून अवलक्षण करून घेण्याची अवदसा मला कोठून आठवली कोण जाणें. [ जाते.

**दिनेश्वर:**—चंद्रेश्वरा, खरोखरच का शिशुपाल आले ?

**चंद्रेश्वर:**—हो खरें म्हणजे काय ? स्वयंवराचे अगोदर लढाई होत नाहीं; सर्व राजांनीं स्वयंवराला हजर रहावें असें राजमंडळानें ठरविलें; शिशुपाल मंडपांत एव्हांना दाखलहि झाले असतील; मी घाईघाईनें तुम्हांला सांगायला आलों.—लढाई होईल म्हणून तुम्ही मंडपांत गेला नसाल, हें माझेंच भविष्य अखेर खरें ठरलें !

**दिनेश्वर:**—एकूण स्वयंवर सुरळीत पार पडणार म्हणायचें ?

**चंद्रेश्वर:**—हो हो, पार पडणार.—बाबा, चला लवकर.—स्वयंवर सुरळीत पार पडणार. या चंद्राचें भविष्य खरें ठरल्यावांचून कसें राहील ?

**दिनेश्वर:**—मुला, भविष्यासंबंधानें कोणीहि असा अभिमान धरूं नये.—मी तुझ्याप्रमाणें लहान होतों, त्यावेळीं मलाहि असाच अभिमान वाटत होता. पण ह्या पिकलेल्या केसांचा असा अनुभव आहे, स्पष्ट स्पष्ट सांगितलेलें भविष्य हमखास खोटें ठरतें, दुतोंडी भविष्य निम्मेशिम्में खरें उतरतें, आणि अस्पष्ट भविष्य कधींच चुकत नाहीं.—अरे मी कंसाच्या जवळ होतों, सकाळींच पत्रिका पाहिली होती, सर्व ग्रह जागच्या जागीं धट्टेकट्टे होते, दोन प्रहरीं मीं कंसाचा हात पाहिला तोहि शाबूत होता; आणि घटका दोन घटकेंत कंसाला कृष्णानें मारून टाकला ! कंसाप्रमाणें त्याच्या नऊहि ग्रहांना कृष्णानें लाथाबुक्यांनीं मारलें !—कंस पृथ्वीवर मेला असला तरी सूर्यलोकांत—चंद्रलोकांत—जिवंत आहे, असें सांगून मीं जरासंधाच्या विश्वास ज्योतिषावर पुन्हां बसविला. पण तेव्हांपासून निश्चय

केला, कृष्णासंबंधानें दुतोंडी भविष्य सांगावयाचें; एकतोंडी भविष्य त्या जबरदस्तापुढें चालतच नाहीं.

**चंद्रेश्वर:**—मग आज दुतोंडी भविष्य कोणतें वर्तविलें आहे ?

**दिनेश्वर:**—हो बरें विचारलेंस. दुतोंडी भविष्याच्या चार जोड्या आज मीं तयार केल्या आहेत. त्यापैकीं दोन जोड्या तूं चालविल्या पाहिजेत आणि मी दोन जोड्या चालविणार.

**चंद्रेश्वर:**—चार घोडे रथाला जुंपून मला ते सहज हाकतां येतात.—माझी चौकडी कोणची ?

**दिनेश्वर:**—तूं स्वयंवराचे मंडपांत शिशुपालाचे कानांत सांग, 'रुक्मिणी तुझी, खास तुझी, त्रिवार तुझी;' आणि लगेच शाल्वाशीं खलबत कर, 'शिशुपालाच्या हातून रुक्मिणी निसटली, पार पळाली, गेली.'

**चंद्रेश्वर:**—ही एक जोडी झाली; आणि दुसरीं दोन तट्टें ?

**दिनेश्वर:**—रुक्मीला म्हणावें, 'मंडप कोसळणार, पडणार, ढासळणार,' आणि महाराजांना आश्वासन द्यावें, 'मंडप शाबूत राहणार, धक्का नाहीं.—चालीव ही तूं चौकडी. ( चंद्रेश्वर जाऊं लागतो. ) पाहतों कसे घोडे हाकतोस ते !

**चंद्रेश्वर:**—पण बाबा, तुमची चौकडी कोणची तें सांगा ना ? नाहीं तर माझा रथ नेमका तुमच्याच रथावर आदळावयाचा !

**दिनेश्वर:**—मी रुक्मिणीला सांगणार, 'कृष्णाच्याच गळ्यांत माळ घाल,' आणि लगेच महाराणीचे कान गांठून म्हणणार, 'शिशुपालाच्या पत्रिकेचे गुण अधिक जुळतात.' कृष्णाला लवून सांगणार 'जन्मकाळचे तुझे ग्रहच जबरदस्त, तुला अपयश कोठेंच नाहीं.' पण कथकैशिकाजवळ मनांतलें गुपित कथन करणार 'कृष्णाचे ग्रह चांगले नाहींत.'

**चंद्रेश्वर:**—बाबा, ह्या आठांपैकीं कोणचें तरी एक भविष्य खरें ठरलेंच पाहिजे.

**दिनेश्वर:**—आणि तसें जर ठरलें नाहीं, तर माझ्याच कपाळाची कवटी उलटी लागली आहे, असें म्हणावें लागेल. [ जातात.

## प्रवेश तिसरा.

[ स्वयंवराचा मंडप. जरासंध, कृष्ण, क्रथकैशिक, शिशुपाल, शाल्व, रुक्मी, भीष्मक वगैरे राजे बसले आहेत. भाट राजांचीं स्तुतिस्तोत्रें गात आहेत. ]

पहिला:— श्लोक २५.

विदर्भी खरा थोर आनंद झाला,
समारंभ हा धन्य; सम्राट आला ॥
क्षणीं भग्न हो यादवांचा अबोला;
न लागो, म्हणा दृष्ट संमेलनाला ॥ १ ॥

दुसरा:— श्लोक २६.

गमे रुक्मिणी स्वर्गसौंदर्यखाणी,
रती ही दुजी मन्मथाची निशाणी ।
कसा मंडपीं वीर कृष्णासि आणी;
महाबंधनें प्रेमपाशें शहाणी ॥ १ ॥

भीष्मक:—सम्राट जरासंध महाराज, शिशुपाल महाराज, आपण सर्वांनीं माझ्या मुलीच्या स्वयंवराचा हा मंडप सुशोभित केला, हा विदर्भदेशाचा बहुमानच झाला. स्वयंवर म्हणजे भांडणाचें मूळ, दुहीचा प्रारंभ व युद्धाला आव्हान, असा दुर्लौकिक माझ्या मुलीच्या स्वयंवरानें होतो कीं काय, अशी आतांपर्यंत भीति वाटत होती; पण राजमंडळाच्या मजवरील प्रेमामुळें ती काळजी दूर झाली आहे. हा मंडप आपल्या आगमनानें सुशोभित करून मजवर जें प्रेम दाखविलें आहे, तें प्रेम स्वयंवराचें मंगलकार्य संपून माझ्या मुलीचा लग्नोत्सव चालला असतांनाहि तसेंच कायम ठेवावें, असें राजमंडळापाशीं माझें प्रेमाचें मागणें आहे.

पद २७ ( राग-कॉफी, ताल-त्रिवट. 'सुखकर आई' या चालीवर. )

**बहुजन-सुख पाही शुभविवाहीं ॥ धृ० ॥ लागे लग्न, नोहे अपमान; वधु जरी ना वरी, अपयश नाहीं ॥ १ ॥**

रुक्मी, तुझ्या बहिणीला आतां मंडपांत प्रवेश करूं दे; आणि स्वेच्छेला येईल त्या राजाला रुक्मिणीला माळ घालूं दे.

[ मुली नाचत प्रवेश करितात व त्यांच्यामागून रुक्मिणी माळ घेऊन येते. ]

**रुक्मी:**—ताई, तुझ्या स्वयंवराकरितां सर्व देशाचे राजे जमले आहेत, सम्राट राजाधिराज जरासंध महाराज हे येथें बसले आहेत; प्रतापी शाल्व, महाप्रतापी शिशुपाल आदिकरून राजमंडळाचे आधारस्तंभ ह्या बाजूला बसले आहेत; आणि क्रथकैशिक, वक्रदंत, श्रीकृष्ण वगैरे राजमंडळाचे प्रतिस्पर्धी दुसऱ्या बाजूला बसले आहेत. रणांगणावर युद्धाचे वेळीं जसे दोन पक्ष दिसतात, तसेच दोन पक्ष ह्या स्वयंवराचे मंडपांतहि दिसत आहेत ! युद्धाचे वेळीं वीरांच्या अंगची शक्ति सत्पक्ष कोणता ह्याचा निवाडा देत असते, आणि ज्या प्रसंगीं सत्पक्ष कोणता ह्याचा निवाडा देतांना वीरांची शक्ति थकून जाते व समरभूमि निवाडा देण्याचें नाकारते, त्या प्रसंगीं, पुरुषांच्या हातचें न्यायाधीशाचें काम बायका आपल्याकडे घेत असतात. मथुरेच्या युद्धांत सतरा वेळां पराभव पावूनहि निवाडा झाला नाहीं, असें म्हणणारा हा कृष्ण शेवटचा निकाल ऐकण्याकरितां ह्या मंडपांत आला आहे. तेव्हां शिशूपालाचे गळयांत माळ घालून मथुरेच्या युद्धाची परिसमाप्ति तूं आज कर, आणि विदर्भदेशाचे धन्यवाद सर्व राजमंडळाला गावयास लाव.

**शिशुपाल:**—रुक्मी, मथुरेच्या युद्धाची गोष्ट निघाली म्हणून मला बोलणें भाग आहे. रणांगणावर आम्हांस नेहमीं जयच मिळाला; कंस-वधाचा सूड आम्हास उगवितां आला नाहीं, ह्याचें कारण ह्या कृष्णानें सतरा वेळा माझ्या समोरून पळून जाऊन तोंड काळें केलें, हें होय.

असल्या सुंदर राजकन्या म्हणजे वीरांच्या भोग्यवस्तु होत, सत्पक्ष व खोटा पक्ष असला निवाडा देण्याचा अधिकार सौंदर्याला नाहीं; आणि मी ह्या मंडपांत आलों तो माझ्या शौर्याचें बक्षीस मिळविण्याकरितां आलों, राजमंडळाचे कृत्याबद्दल निवाडा ऐकण्याकरितां नव्हे.

**कृष्ण:**—मी आलों आहे तो निवाडा ऐकण्याकरितां आलों आहें. मीं कंसाचा वध केला नसून राजमंडळांतील अनीतीचा वध केला आहे, आणि म्हणूनच मला सतरा वेळां जय मिळाला. जेथें धर्म तेथें जय. ह्या धर्माचा विजय बायका चिरस्थायी करितात, म्हणून कंसवधापासून सुरू झालेल्या धर्माची स्थापना चिरस्थायी करण्याकरितां मला स्वयंवराला आमंत्रणाशिवाय येणें भाग पडलें. निर्मल अन्त:करणाची, निर्दोष सौंदर्याची, आणि सद्धर्माची खाण म्हणून राजकन्येचा लौकिक आहे, आणि असल्या आदिशक्तीच्या सिंहासनापुढें पुरुषार्थाचा निकाल लागत असतो.

**पद** २८ (राग—हमीर, ताल—एकताल; 'दीम दारा दिर दिर' या चालीवर.)

**सुंदर-मुख ललना, निजजनक-कुल-मना, तनमन नच देई**
**अधम जना;—सहज असा नियम दावि निजलग्नीं, सदय-**
**हृदय विनय-विनत न्यायरत रीतियुत अंगना ॥ धृ० ॥**
**सुखद लग्न असु-विकसन; नरतनु बलधन कर्मधाम, सुख-**
**विलासनीं कुशल नाहीं वधुसमान; नीकटि गमन धर्म जाण;**
**नयविनयचि पथ विशाल संलग्ना ॥ २ ॥**

रुक्मी, राजकन्येच्या हातांतील माळेनें जर कंसवधाचें माझें कृत्य अधर्माचें ठरविलें, तर माझेंच कोठें तरी चुकलें असें समजून सम्राट जरासंध ह्यांच्या राजमंडळाचा विरोध करण्याचें मी सोडून देईन.

**शिशुपाल:**—तूं सोडून देऊन गप्प घरीं बसशील, पण बसूं कोण देतो ?

राजकन्ये, तुझ्या स्वयंवराचे मंडपाचा विध्वंस न करितां मी शांतपणें मंडपांत आलों, ह्याचें कारण, सौंदर्याला विनाकारण दुखविणारा हा शिशुपाल नव्हे, हें होय; मीं तुला जरा देखील दुखवूं इच्छित नाहीं; सुंदर सुवासिक फुलें तळ. हातावर अलग धारण करावयाचीं असतात, चुरडावयाचीं नसतात.

कथ—मग मंडप जाळण्याचा धाक कृष्णाला कां घातला होता?

**शिशुपाल:**—मंडप जाळण्याचा धाक कृष्णाला घातला होता, व अजूनहि घालीत आहें; मंडप पोळण्याचें भय भीष्मकाला घातलें होतें; आणि अजूनहि घालीत आहें. ह्या सर्व राजांच्या देखत, स्वयंवराचे मंडपांत उभा राहून राजकन्येसमोर मी प्रतिज्ञा करितों, ह्या कृष्णाचा व रुक्मिणीचा जर विवाह झाला तर यादवांचें व माझें हाडवैर आजन्म राहील, आणि कृष्णापासून रुक्मिणीचें हरण जबरदस्तीनें केल्याशिवाय माझ्या या खड्गाला कधींहि विसावा मिळणार नाहीं—कृष्णा, रुक्मिणीनें जर आतां माळ मला घातली तर प्रथम मी ह्या मंडपांत तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध करीन, आणि कंसवधाचा सूड उगवून सम्राट जरासंधाचे शब्दांतून मी मोकळा झाल्यावर ह्या सुंदरीच्या लग्नोत्सवाचे उपभोग भोगीन. पण रुक्मिणीनें जर तुला माळ घातली तर त्या माळेबरोबर यमपाशच तुझ्या गळ्यांत राजकन्येनें घातले, असें रुक्मिणीला दाखवून, स्वयंवराचे मंडपांतून राणी म्हणून नव्हे तर दासी म्हणून राजकन्ये, तुला बाहेर पडावें लागेल.

पद २९ (राग—गौडमल्हार, ताल—त्रिवट. 'तन् नादिरदिर दानी' या चालीवर)

**जरि धरिल अजि ही मलिन काळा, मी रिपु—रुधिर— जलें**
**तरि करिन खलतम—तिमिर—तिमित तिज विमला ॥ धृ० ॥**
**भग्न होई लग्न पाही; कृष्ण काळा मारिला; कामुका बालिका**
**भोगिनी ही दासी हो मला ॥ १ ॥**

कृष्णा, तुझा वध ह्या मंडपांतच विधात्यानें लिहिलेला आहे हें पक्कें समज'

अशाच शृंगारलेल्या मंडपांत तूं कपटानें कंसाचा वध केलास ! मी सांगून सवरून तुझा आज वध करणार आहें.

**कृष्णः**—राजकन्येची इच्छा असेल, तर शिशुपाल, जरासंध, किंवा रुक्मी, ह्या तिघांपैकीं पाहिजे त्याच्याशीं, किंवा एकदम तिघांशीं मिळून ह्या मंडपांत द्वंद्वयुद्ध करण्यास मी तयार आहें. इतकेंच नव्हे तर ह्या तिघांपैकीं पाहिजे त्याच्या किंवा तिघांच्याहि रक्ताचा सडा ह्या मंडपांत घालून किंवा तिघांच्याहि शरिरांतील एक बिंदुहि जमिनीवर न सांडतां, तिघांनाहि हतवीर्य करून, जमिनीवर पाडून तिघांच्याहि डोळ्यांना स्वयंवराची माळ ह्या छातीवर लोळलेली पहावयास लावण्याचें मला सामर्थ्य आहे. पण रुक्मिणी, तुला जर हा शिशुपाल पसंत असला, तर खुशाल त्याच्या गळयांत माळ घाल; तुझा संसार दुःखाचा करावा म्हणून मी कोणाशींहि युद्ध करणार नाहीं, असें तुला आश्वासन देतों.

**रुक्मीः**—ताई, कृष्णाचें हें वचन म्हणजे नेभळ्याचें आत्मशांतवन आहे.– कृष्णा, तूं निर्बल आहेस, हें तुला बरें वेळेवर समजूं लागलें ! दुर्बल माणसें कपटी असतात, आणि ताई, हा कृष्ण आपल्या कमकुवतपणाला धार्मिक औदार्याचें स्वरूप देऊन तुला फसवूं पहात आहे. कृष्णा, तूं शक्तिहीन, तेव्हां माझ्या बहिणीनें आतां शिशुपालाच्या गळ्यांत माळ घातल्यावर आतांचें तुझें कपटाचें भाषण तुला मृत्यूचे मुखांतून सोडवील, असें बिलकूल समजूं नकोस. स्वयंवराची माळ गळ्यांत पडल्यानें आनंदाचे भरांत शिशुपाल महाराजांनीं जरी तुला जिवंत सोडलें, तरी मी तुझ्याशीं ह्या मंडपांतच खड्गयुद्ध करणार असून अधिराज जरासंध ह्यांच्या देखत, कंस–वधाचा सूड उगविणार आहें.–ताई, शिशुपाल महाराजांचें सामर्थ्य तुझ्या दृष्टीस पडलेंच आहे, स्वतःचा नेभळेपणा स्वतःचे तोंडून कृष्णानें बोलून दाखविला आहे, तेव्हां ताई, तूं आतां शिशुपालाच्या गळ्यांत माळ घाल व मला कंसवधाचा सूड उगविण्याची आज्ञा दे.

**रुक्मिणीः**—दादा, कंसवध करणारांची सेवा घडावी म्हणून मी ही माळ हातांत घेतली आहे. दादा, त्यांचें सामर्थ्य किती अलोट आहे, तें काल मीं डोळ्यांनीं पाहिलें असून, त्यांचें औदार्य सामर्थ्याहूनहि अधिक आहे, असें आतांच दादा, माझ्या अनुभवाला आलें आहे. [ शिशुपालापुढून कृष्णाकडे जाऊं लागते. ]

**शिशुपालः**—ह्या अपमानाचे परिणाम फार भयंकर होतील. दासी म्हणून माझ्या शिबिरांत येण्याचा विचार दिसतो !

**रुक्मिणीः**—[ कृष्णाजवळ जाऊन ] कंस-वध करून राजमंडळांत धर्मस्थापना करणाऱ्या पुरुषसिंहाला—

**रुक्मीः**—[ रुक्मिणीला मागें लोटून ] माझी बहीण दासी नको व्हावयाला—( मंडपांत चोहोंकडे 'हें काय ?' 'हें काय ?' ) सांगतों काय तें.—माझी बहीण दासी नको व्हावयाला—रुक्मिणी, तुझीं आर्जवें केलीं, तुला समजून सांगितलें, ऐकत नाहींस. निर्वाणीचा उपाय मला योजला पाहिजे. ( खड्ग उपसतो. मंडपांत 'हें काय ?' 'हें काय ?' ) हा प्रत्येकाचा हक्क आहे; आपल्या बहिणीला कपटी भाषणानें फसविणाराचा वध करण्याचा हक्क मला आहे. कृष्णा, खड्ग-युद्धाला ये—

**रुक्मिणीः**—दादा, हें काय ? माझ्या मर्जीस येईल, त्याच्या गळ्यांत मी माळ घालायचीना ?

**रुक्मीः**—तुझ्या मर्जीस येईल त्याच्या नव्हे; माझ्या मर्जीस येईल त्याच्या गळ्यांत—तूं स्वेच्छेनें आणि आनंदानें—माळ घालायची.—कृष्णा, खड्ग उपस.

**कृष्णः**—राजकन्ये, तूं भिऊं नकोस.—मल्लयुद्धाला किंवा खड्गयुद्धालाहि मी तयार आहें.—राजकन्ये, ह्या उन्मत्ताला एका हातानें जिवंत धरून स्वयंवर पार पाडण्याला मी समर्थ आहें.

**रुक्मी**:—रुक्मिणीनें कृष्णाला माळ घातलेली मी जिवंतपणीं कधींहि पहाणार नाहीं. कृष्णा, ह्या जागीं तूं तरी मेलें पाहिजेस किंवा मीं तरी मेलों पाहिजे.

**कृष्ण**:—तुला जिवंत ठेऊन, तुझ्या छातीवर गुडघा रोंवून, तुझ्या डोळ्यांना माझ्या गळ्यांतील रुक्मिणीची माळ पहाण्यास लावीन.

**रुक्मी**:—हा भ्रम आहे. माझ्या उजव्या हातांतील हें माझें खड्ग तुझ्याशीं लढत असतांना, तुझी सरशी झाल्यास, माझ्या डाव्या हातांतील हा खंजीर तुझा गुडघा छातीला शिवण्यापूर्वींच माझ्या हृदयांत शिरेल!—रुक्मिणी, मी आतां कृष्णवध करून तुझ्या हातांतील माळ शिशुपालाचे गळ्यांत तुला घालावयास लावीन, किंवा दुर्दैवानें ती माळ जर कृष्णाचेच गळयांत पडावयाची असेल, तर तुझ्या भावाचें शिर त्या माळेंत गुंफून माझ्या रक्तानें भिजलेली ती माळ ह्या गवळ्याच्या गळयांत घालावयास तुला मिळेल.

[ खड्ग उपसून लढूं लागतात. ]

**रुक्मिणी**:—[ मध्यें पडून ] थांबा, थोडे थांबा; दादा, प्रथम माझें ऐक, आणि मग पाहिजे तर युद्ध कर.—खड्ग मागें घ्या; दादा, खड्ग मागें घे.—माझ्या भावाच्या रक्तानें लाल झालेल्या भूमीवर उभी राहून मी स्वयंवर करूं इच्छित नाहीं; ही रुक्मिणी ह्या जागीं, ह्या वेळीं कोणताच वर पसंत करीत नाहीं.—माझ्या स्वयंवराच्या ह्या अद्भुत प्रसंगामुळें मी आणखी थोडकें ह्या सभास्थानीं बोलतें. ह्यामुळें विदर्भदेशच्या कन्या विनयशील नसतात, असें आपण मानूं नका.—ह्या हतभागी रुक्मिणीचें स्वयंवर मोडलें, संपलें, स्वेच्छेनें वर पसंत करण्याचा माझा हक्क मीं स्वेच्छेनें गमावला.—राजमंडळापाशीं—यादववीरांपाशीं ह्या प्रसंगीं मी एवढीच भीक मागत आहें, कुंडिनपुरांत मजकरितां कोणींहि कोणाशीं लढूं नये.—दादा, तुझ्या इच्छेला मीं अंशतः तरी ह्या वेळीं मान दिला आहे, तेव्हां आणखी एक वर्षभर माझ्या लग्नाची गोष्टच काढूं नकोस, आणि एक वर्षानंतर पुन्हां स्वयंवर ह्याच ठिकाणीं सुरू कर.

**रुक्मीः**—पुढचें पुढें पहातां येईल.—राजेहो, रुक्मिणीचें स्वयंवर मोडलें.

**शिशुपालः**—स्वयंवर मोडलें, आपल्यासारखें झालें; स्वयंवर मोडलें. कृष्णा, रुक्मिणीची आज्ञा नाहीं, म्हणून तुझ्याशीं आम्हीं येथें लढणार नाहीं; पण विदर्भदेशची हद्द ओलांडतांच मथुरेच्या युद्धास पुन्हां सुरुवात होईल, आणि एक वर्षाचे आंत कृष्ण—वध करून रुक्मिणीशीं लग्न करण्या-करितां मी कुंडिनपुरास येईन.—चला, राजेहो चला, रुक्मिणीचें स्वयंवर मोडलें, आमचा जय झाला, रुक्मिणीचें स्वयंवर मोडलें.

**रुक्मीः**—रुक्मिणीचें स्वयंवर मोडलें; सर्व राजांनीं जरासंध महाराजांच्या शिबिरांत पुढील विचारासाठीं आतां चलावें; चला, आमचें काम झालें, रुक्मिणीचें स्वयंवर मोडलें. [ सर्व राजे जातात.

**रुक्मिणीः**—महाराज, ह्या दासीच्या आतांच्या वर्तनाबद्दल राग नाहींना व्हावयाचा ? बायकांना तितका पोंच नसतो; तेव्हां आतांच्या घाईघाईच्या वर्तनानें मी मनांतून उतरलें तर नाहींना ?—विजय संपादन केल्यावरहि मथुरेचें राज्यपद ज्यांनीं नाकारलें ते पुरुषसिंह, भावाचा जीव वांचविण्याकरितां लग्नाचे सुखोपभोग एक वर्षभर पुढें ढकलणाऱ्या अबलेवर रोष करणार नाहींत असें मला वाटतें.—पण बाई—

**कृष्णः**—राजकन्ये, तुझ्या आतांच्या वर्तनानें तूं मला पूर्वींहून अधिक प्रिय झाली आहेस; इतकेंच नव्हे, तर स्वकीयांचा संहार टाळण्याकरितां स्वसुख कसें सोडलें पाहिजे, ह्याचा तूं ह्या वेळीं आम्हां सर्वांना कित्ता घालून दिला आहेस.—राजकन्ये, तूं मला अधिक प्रिय झाली आहेस, हें मी ह्या वर्षांत कृतीनेंच तुझ्या नजरेस आणीन. कंसवधाचे वेळीं मथुरेचें राज्यपद नाकारण्यांत मीं जें धर्म—कृत्य केलें, त्याचेंच आतां अनुकरण तूं केलेंस; आणि पुढील माझ्या आयुष्यांत मी आतांच्या तुझ्या वर्तनाचेंच अनुकरण

करीन.—रुक्मिणी, स्वकीयांच्या संहाराच्या युद्धांत आत्मसंरक्षणाशिवाय इतर कोणच्याहि वेळीं हा कृष्ण हातांत शस्त्र धरणार नाहीं.—राजकन्ये, पुढील वर्षांत स्वतःच्या संरक्षणाचे युद्धांत तुझ्या भावाच्या केसालाहि धक्का न लावतां मी जरासंधाला व शिशुपालाला फजीत करीन. स्वतःचें नवीन राज्य अभुक्त भूमींत स्थापून तुझ्या पाणिग्रहणाकरितां हा कृष्ण एक वर्षानें कुंडिपुरांत परत येईल.

पद ३० (राग सारंग, ताल–त्रिवट; 'साचि कहतयाकि' या चालीवर.)

कांता मजसि तूंचि, गुरुहि तूंचि; तुजसि निर्मी नेता विधाता ॥ धृ० ॥ बिकट रणीं मज शास्ता आतां तुझें भाषण; कधि न आप्ता रणीं वधिन; तूंचि रणाला नियंता ॥ १ ॥

[ कृष्ण वगैरे जातात ]

रुक्मिणीः—ह्याला म्हणावें पुरुषश्रेष्ठ! असला पुरुषश्रेष्ठ सोडून त्या शिशुपालाचे गळ्यांत माळ कोण घालणार!—महाराज, ह्या वर्षांत आपण सर्व ठिकाणी सर्व काळीं विजयीच व्हाल; आणि माझ्या दादाच्या देखत 'पुरुषोत्तम' ह्या नांवानें आपला जयजयकार करून मी आपल्या गळ्यांत माळ घालीन.

पद ३१ (राग–पहाडी, ताल–कवाली. 'चल गये' या चालीवर.)

नरवर कृष्णासमान घेतसे जन्मा, भाग्य उदेलें हें, शिकवी सुकर्मा ॥ धृ० ॥ बहुत नृपति ते आले गेले, परि मनाला यदुवर झाला मंत्र महान ॥ १ ॥ [ पडदा पडतो.

अंक दुसरा समाप्त.

---

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

[ महाराणी, भीष्मक, स्नेहलता व दिनेश्वर, प्रवेश करितात.]

भीष्मकः—

पद ३२ ( राग-खमाज, ताल-दीपचंदी, 'ऐसी ना मारे पिचकारी' या चालीवर. )

**बहु नवल जरी नेई यदुसि काळ ॥ धृ० ॥ मति चपल अति,**

**बल-धन यौवन, मृत कसा यदुबाल ॥ १ ॥**

मला तर ही बातमी ऐकून आश्चर्य वाटतें! रुक्मिणीनें ही बातमी ऐकल्यापासून हांथरुणच धरलें आहे.—काय स्नेहलते, तुम्ही मैत्रिणीला—रुक्मिणीला—सायंकाळीं नगराबाहेरच्या बगीच्यांत किंवा नदीकांठच्या रम्य प्रदेशांत रोज क्रीडेसाठीं घेऊन जाऊं लागल्यास सात आठ दिवस झाले नव्हे? तिच्या मनाला आतां थोडेसें तरी बरें वाटतें का?

स्नेहलताः—कसचें बरें वाटणार? त्यांची खिन्नता रोजच्या रोज वाढते आहे, आणि ह्या दिनेश्वरानें आज सांगितलेलें पुराण ऐकून तर ताईसाहेबांच्या उदासीनतेची आमावास्याच झाली आहे.

महाराणीः—दिनेश्वर, आज कोणची हकीकत तुम्ही मुलीला सांगितली?

दिनेश्वरः—महाराणीसाहेबांपाशीं कृष्ण-दहनाची जी गोष्ट मीं काल सांगितली, तीच आज ताईसाहेबांना सांगितली!

भीष्मकः—कृष्ण-दहनाची हकीकत तुम्हांला खरी वाटते काय?

दिनेश्वरः—ताईसाहेबांनीं आज सकाळीं तोच प्रश्न केला, आणि त्यांना जें मीं उत्तर दिलें तेंच आतां महाराजांनाहि देतों; पण महाराज, आपला प्रश्न आतांचा आहे, तेव्हां आतांच्या वेळेवरून प्रश्न-कुंडली मांडूं का ताईसाहेबांच्या सकाळच्या वेळेवरून मांडूं?

**भीष्मकः**—सकाळचें उत्तर तर मला सांगा.

**दिनेश्वरः**—तें सांगतोंच; पण हा ज्योतिषी दोन हातांनीं दोन प्रश्न-कुंडल्या चालवूं शकतो.—प्रसंग आलाच आहे, तेव्हां थोडासा ग्रहांचा चमत्कार सरकारला दाखवितों.—सरकारला माहीतच आहे, स्वयंवराचे वेळीं शनिमंगळाची युति होती! शिशुपाल आणि कृष्ण दोघेहि एका मंडपांत आले होते! अहाहा! काय तंतोतंत आकाशांतील ग्रहांचा पडताळा येथें दिसतो! आपण पाहिलेंत ना? एका मंडपांत एकमेकांजवळ शनिमंगळ! महाराज, त्यावेळीं शनिमंगळामधून शुक्राची चांदणी जात आहेसें आकाशांत मला दिसलें; त्याबरोबर मी चंद्रेश्वराला सांगितलें, शनिमंगळाची टक्कर ताईसाहेब थांबविणार व आतां स्वयंवर थांबणार. मी इतकें म्हणतों तों 'स्वयंवर थांबलें' 'स्वयंवर थांबलें' म्हणून चोहोंकडे हाकाटी!—माझा मुलगा चंद्रेश्वर तर मला 'ज्योतिष्यांचा नायक' 'ज्योतिष्यांचा राजा' 'ज्योतिष्यांचा सम्राट' म्हणून डोक्यावर घेऊन नाचला! मी म्हणें, आलें एखाद वेळ तंतोतंत बरोबर, तर त्याबद्दल इतका हर्ष कशाला? चंद्रेश्वराला अतिहर्ष झाला, मला डोक्यावर घेऊन नाचला; अतिहर्ष झाला! माझें भविष्य केसभरहि असें का तसें ढळत नाहीं, म्हणून मला शिशुपालमहाराजांनीं मथुरेच्या स्वारींत बरोबर नेलें!

**भीष्मकः**—मग काय कृष्ण-दहन तुम्हीं डोळ्यांनीं पाहिलें?

**दिनेश्वरः**—मी पहातों कशाला? मी पत्रिका मांडून बसलों होतों; हो हो पाहिलें; पत्रिकेंत कृष्णाला जळतांना मीं प्रत्यक्ष पाहिलें.

**स्नेहलताः**—पत्रिकेंत पाहिलेंत ना? श्रीकृष्ण खात्रीनें जिवंत आहे.

**दिनेश्वर**—असेल जिवंत; नाहीं कोणी म्हणावें? पण पत्रिकेंत जळाला, ज्योतिषांत जळाला; भविष्यांत जळाला! कृष्ण-दहनाची कथाच तशी आहे. जरासंध, शिशुपाल, रुक्मी, ह्या मूर्तिमंत आगी मथुरेवर चाल करून गेल्या; तेव्हां मथुरा जळून खाक होणार असें पाहून यादवांनीं मथुरेतून

पलायन केलें.–तो योगच तसा होता.–यादवांच्या पायांवर सर्व पळपुटीं नक्षत्रें पडलीं होतीं.–मीं जरासंध महाराजांना सांगितलें श्रीकृष्ण निसटून पळून जाणार. लगेच त्यांनीं–चतुरच ते–माझा संकेत ओळखला; माझ्या भविष्याप्रमाणें वागण्याचा निश्चय केला,–चतुरच ते–मीं म्हटलें मात्र शनिमंगळ एकमेकांजवळ असून एकमेकांच्या अंगावर बाणांची वृष्टि करून आगीसारखे तांबडे लाल झाले आहेत–आगीसारखे म्हणण्याबरोबर त्या चतुरानें श्रीकृष्णाच्या शिबिरासभोंवारच्या अरण्याला आग लावून दिली!

**महाराणीः**—आणि त्यांत श्रीकृष्ण जळून मेला!

**स्नेहलताः**—जळून कसचे मरतात; ते निघून गेल्यावर मागाहून आग लावून दिली.

**दिनेश्वरः**—कोणी म्हणत पळून गेला, कोणी म्हणत जळून मेला; मीं प्रश्न पाहिला, कुंडली मांडली. कंसाच्या दोन्ही बायकांनीं दोन प्रश्न विचारले. त्या वेळीं सरसर दोन हातांनीं दोन कुंडल्या मांडल्या! असला चमत्कार कोणाहिं ज्योतिष्यानें ह्या पूर्वी करून दाखविला नसेल.–डाव्या हातानें एक प्रश्नकुंडली मांडली आणि त्याच वेळीं उजव्या हातानें दुसरी प्रश्नकुंडली मांडली! आकाशांतून देवांनीं पुष्प–वृष्टि त्या वेळीं केली म्हणतात! पण तें जाऊं द्या.–एका कुंडलींत आलें कृष्ण जिवंत, एका कुंडलींत आलें कृष्ण मेला! मीं लगेच दिवा आणला, दोनहिं कागद एका जागीं जाळले, आणि भविष्य वर्तविलें, कृष्ण जिवंतहि नाहीं, कृष्ण मेलाहि नाहीं, कृष्ण जळाला हें खरें भविष्य.

**भीष्मकः**—एकूण श्रीकृष्ण जिवंत असण्याचा संभव आहे तर?

**दिनेश्वरः**—आपला तसा विश्वास असेल तर जिवंतहि असेल; कारण ज्योतिष बरोबर येणें, हें विश्वासावर अवलंबून आहे. कृष्ण जळाला असें मीं भविष्य वर्तविलें, आणि लगेच कंसाच्या दोन्ही बायकांनीं अग्निप्रवेश केला.–कृष्णदहनापर्यंत अग्निप्रवेश करणार नाहीं, अशी त्यांनीं प्रतिज्ञा केली

होती. माझ्या ज्योतिषाच्या जोरावर कृष्ण–दहन सिद्ध होऊन कंसाच्या बायका सती गेल्यावर, यादव दक्षिणेस समुद्रापर्यंत मागें हटले आणि मथुरेंत शिशुपाल मोठ्या थाटानें शिरला. यादवांनीं समुद्रकांठीं द्वारकेस नवी राजधानी स्थापिली, अशी बातमी ऐकून त्या राजधानीच्या पश्चिमेकडून कालयवनांनीं यादवांवर चाल करून जावें, आणि मथुरावृंदावनाचा बंदोबस्त शिशुपालमहाराजांनीं करावा असें ठरवून सम्राट जरासंध मगध देशांत परत गेले; आणि कृष्णदहनाची बातमी आपणास सांगण्याकरितां मी कुंडिनपुरास आलों.

**महाराणीः**—मग पुढें कालयवनांच्या युद्धाचें काय झालें ?

**दिनेश्वरः**—कालयवनांच्या युद्धाकडे माझा मुलगा चंद्रेश्वर गेला आहे, तो आल्यावर ती बातमी कळेल. मथुरेच्या ह्या स्वारींत माझा जसा विजय झाला, त्याप्रमाणें कालयवनांच्या स्वारींतहि माझ्या मुलाचीच वाहवा व्हावयाची.—माझा मुलगा माझ्याहूनहि मोठा ज्योतिषी होणार; तेव्हां मथुरेस मी जाळलेल्या कुंडलीच्या आगींतून जर श्रीकृष्ण पळाला असेल तर पुढें चंद्राचा ताप आहेच.

**स्नेहलताः**—चंद्राच्या तापानें रुक्मिणीबद्दलचा विरहाग्नि काय तो असह्य होईल इतकेंच.

**दिनेश्वरः**—तथास्तु.—तसें कां होईना, ज्योतिषांच्या कचाटींतून श्रीकृष्ण पार पडणें मुष्किल !

**महाराणीः**—हें पहा स्नेहलते, कृष्ण–दहन कदाचित् खरें असेल, कदाचित् खोटें असेल. पण दैववशात् जर तें खरें ठरलें तर शिशुपालाविषयीं रुक्मिणीच्या मनांत तेढ राहणार नाहीं, अशा धोरणानें तूं रुक्मिणीशीं बोलत जा.

**भीष्मकः**—तसें कांहीं नको बोलायला. ह्या बाबतींत कोणीच रुक्मिणीशीं कांहींच बोलूं नका. आपला काळ अनिष्ट आहे, आणि अनिष्ट काळीं स्वस्थ बसून जें जें होईल तें तें पहावें हेंच योग्य.

पद ३३ ( राग-पिलु-मिश्र, ताल दीपचंदी, ' कान्हा निंद नहि ' या चालीवर. )

**येतां अशुभसा काल नवा, तपानें ध्येय मनिं सेवा ॥ धु० ॥**

**स्वकर आवरा, कूर्म गुरु करा, नेत्र जागवावा ॥ १ ॥** [ पडदा.

---

## प्रवेश दुसरा.

[ **स्थळः**—राजवाड्यासभोंवारचा बाग, रुक्मिणी प्रवेश करिते. ]

**रुक्मिणीः**—त्यांचें दहन झाल्यावर ह्या लतांना नवीन पालवी कां फुटावी ? ह्या नव्या कळ्या फुलझाडावर कशा दिसाव्या ? आम्रमंजरीचें सुगंधी द्रव्य वाहणारा वायु दिमाखानें कां फिरूं लागावा ? ती मदनमूर्ति जळून खाक झाल्यावर हा वसंतकाळ कसा जिवंत राहिला ?—काय म्हणतां, मी त्यांच्या प्रेमाशीं बेइमानी करून शिशुपालाच्या गळ्यांत माळ घालीन म्हणून मजवर सूड उगविण्याकरितां तुम्ही पृथ्वीवर रेंगाळत आहां ?—अथवा दुसरें कोणचें कारण असणार ? त्यांच्या दहनाची वार्ता ऐकल्यावर मी जर मरून पडलें नाहीं तर ह्या नव्या कळ्यांनीं मला हंसण्याकरितां कां फुलूं नये ? आम्रमंजरीच्या उन्मत्त गंधाचें विष मला देण्याकरितां ह्या वायूनें माझ्या सभोंवतीं लपत छपत कां फिरूं नये ? काळाच्या पोटांत अग्निमुखानें ते जसे शिरले, त्याप्रमाणें मीहि शिरतें कीं नाहीं हें पाहण्याकरितां वसंतानें-त्यांच्या मित्रानें—टेहळणी कां करूं नये ?—करा, खुशाल माझा छळ करा. खरें खरें तुम्हांला सांगतें मी जीवंत आहें, कारण तेहि जिवंत आहेत असेंच मला वाटतें. [ पडद्यांत कोकिलरव ] काय म्हटलेंस कोकिले, माझ्याप्रमाणें तुलाहि वाटतें म्हणून तूं आनंदानें गात आहेस ? [ पडद्यांत कोकिलरव ] तुझें हें गाणें म्हणजे आकाशवाणीच मीं समजतें; हो श्रीकृष्ण जिवंत आहेत—[ पडद्यांत कोकिलरव ] आहेत, आहेत, जिवंत आहेत; खरेच

गडे ते जिवंत आहेत–[ पडद्यांत कोकिलरव ] कोठें आहेत म्हणून विचारतेस ? वेडे, तुला जिवंत आहेत हें समजलें, आणि कोठें आहेत हें समजत नाहीं ?–तुला नाहीं समजलें, पण मला माहीत आहे कोठें आहेत ते.–[ पडद्यांत कोकिलरव ] सांगूं म्हणतेस कोठें आहेत ते ? ऐक तर––

**पद ३४** (राग–कालिंगडा, ताल–दीपचंदी, 'रात लढी' या चालीवर.)

**मम मनीं कृष्णसखा रमला; नच रणीं आप्तवधा सजला ॥ धृ० ॥ नवल नाहीं, नच दृश्य इतरां झाला; दहन झालें; शिशुपाल समजे भोळा ॥ १ ॥**

श्रीकृष्ण जळाला असें हे म्हणतात तरी कसे ? श्रीकृष्ण येथें फुललेला मला दिसतो; श्रीकृष्ण माझ्या अंगाला स्पर्श करीत असून त्यांच्या अंगाचा सुगंधहि मला येतो; श्रीकृष्णाच्या मुरलीचा मंजुळ ध्वनि मला ऐकूं येतो; श्रीकृष्ण मग जळेल कसा ?–हां हां बरोबर आहे. श्रीकृष्ण प्रत्यक्ष मदनच्च आहे, हें मला सांगण्याकरितां मदन–दहनाप्रमाणें श्रीकृष्ण–दहनाची कथा यांनीं रचिली असावी ! मदनाला शंकरांनीं जाळलें, पण प्रत्येक प्राण्याच्या–प्रत्येक वस्तूच्या–मनानें त्याला पुन्हां उत्पन्न केलें; श्रीकृष्ण जळाला म्हणून तुम्ही सांगतां, पण मी म्हणतें, तो प्रत्येक मनाचा–प्रत्येक वस्तूचा–मालक झाला आहे. मदनाहून त्यांची योग्यता अधिक. मदन मनांत उत्पन्न होतो. ते मनावर अधिकार चालवितात. जो प्रत्येकाचा स्वामी झाला, तो मला सनाथ केल्याशिवाय कसा राहील ? हो हो झालेंच मी सनाथ; ज्या वेळीं श्रीकृष्ण जळाला म्हणून तुम्ही मला सांगितलेंत त्याच वेळीं मी सनाथ झालें.

**पद ३५** (राग–सूरदासी मल्हार, ताल–त्रिवट. 'गरजत आये' या चालीवर.)

**अनृतचि गोपाला मृत्यु आला, यश ना शिशुपाला ॥ धृ० ॥ कटु वार्ता ती ऐकतां, हृदयीं बोले सखा मज 'तुजला वरियलें' ॥ १ ॥**

फुलांनों तुम्ही खुशाल फुला; श्रीकृष्णाच्या यशाच्या फैलावाशिवाय तुम्ही दुसरें तिसरें कोणतें कार्य फुलून करणार ? वायो, खुशाल वाहा; श्रीकृष्णाच्या गुणाशिवाय दुसरें द्रव्य तुझ्यापाशीं कोणतें असणार ?—कोकिले, खुशाल गा; श्रीकृष्णाच्या लीलाच तूं गाणार ना ? ये वसंता खुशाल ये; सर्व सृष्टि कृष्ण-मय झाली आहे, तेव्हां तूंहि कृष्णमयच असला पाहिजेस, आणि श्रीकृष्णाची आनंदाची बातमी तूं सांगणार असला पाहिजेस. [ दासी प्रवेश करिते.

**दासीः—**

**पद ३६** ( राग—गौडमल्हार, ताल—त्रिवट. 'मोरी नाजुक चुरिया' या चालीवर.)

**अति आनंद फुलवि कलिका; करी नाच झकपक ही लतिका; जवळि डुलत जणु, लचकत हळुहळु, पवन—चेट नट लटका ॥ धृ० ॥ 'उचल' म्हणत मज,—'चटचट पद निज; बसेल फटका; मनासि चटका, म्हणुनि त्वरित ही लगबग येत बालिका ॥ १ ॥**

ताईसाहेब, मी आनंदाची बातमी घेऊन आलें आहें; श्रीकृष्णाची लीला अगाध आहे. श्रीकृष्णांनीं द्वारकेस नवी राजधानी स्थापिली, ही बातमी चंद्रेश्वराकडून मीं ऐकिली, आणि ताईसाहेबांना कळविण्याकरितां लगेच मी धांवून आलें—चंद्रेश्वर आणि स्नेहलता यांच्यापुढें धांवून आलें.

[ चंद्रेश्वर व स्नेहलता येतात. ]

**रुक्मिणीः—**आनंदाची बातमी सांगितलीस म्हणून हें तुला बक्षीस.—चंद्रेश्वर, दासीनें सांगितलेली आतांची बातमी खरी आहेना ?

**चंद्रेश्वरः—**खरी म्हणजे काय ? मी स्वतः द्वारकेस जाऊन श्रीकृष्णाची नवी-राजधानी पाहून आलों; समुद्रकांठीं द्वारकेस श्रीकृष्णांनीं नवें राज्य स्थापिलें आणि द्वारकेंतील त्या राजेन्द्राच्या राज्याभिषेकास मीं स्वतः हजर होतों.

**स्नेहलता**—आणि तुमचे वडील दिनेश्वर श्रीकृष्ण जळाला असें सांगतात, तें खोटेंना ?

**चंद्रेश्वरः**—अगदीं खोटें, सपशेल खोटें.—मथुरेवर शिशुपालानें जेव्हां हल्ला केला त्यावेळीं मी मथुरेंत होतों आणि बाबा शिशुपालाजवळ होते. लग्नकार्यांतल्या ह्या कलहामुळें लोकांच्या घरादारांची नामाडी होऊं नये म्हणून यादव आनर्त देशचे दक्षिणेस समुद्रतीराजवळ जावयास निघाले; त्यांना अडविण्याकरितां वाटेंतील जंगल जाळण्यांत आलें, पण यादव निघून गेल्यावर जंगल जळलें !

**रुक्मिणी**—त्या वेळीं तुम्ही श्रीकृष्णाचे बरोबर होतांना ?

**चंद्रेश्वरः**—बरोबर होतों तर; समुद्राकांठीं द्वारकेची जागा श्रीकृष्णांनीं पसंत केली तेथें नवी राजधानी स्थापिली; आणि शिशुपाल अंगावर चालून आला तर द्वारकेजवळ लढायचें असा श्रीकृष्णानें निश्चय केला. पण जरासंध, शिशुपाल, रुक्मी यांनीं मथुरेस जयोत्सव करून यादव जळाले म्हणून चोहोंकडे पुकारा केला !—ताईसाहेब, शिशुपाल कांहीं द्वारकेवर चाल करून गेले नाहींत, पण कालयवनांनीं मात्र हल्ला केला.

**रुक्मिणीः**—त्यांत कालयवनाचें काय झालें ?

**चंद्रेश्वर**—राजर्षि मुचकुंद यांनीं श्रीकृष्णाला सहाय्य केलें, आणि धोलपुरचे डोंगरांत यवनांचा तळ पडला असतां यादवांनीं जंगलाला आग लावून दिली.

**रुक्मिणीः**—बरें झालें. शिशुपालाची आगलावी युक्ति कालयवनांना चांगली फळली !

**चंद्रेश्वरः**—त्या आगींत कालयवन जळून कालयवनांची सर्व संपत्ति घेऊन यादव द्वारकेस आले. कालयवनांच्या संपत्तीमुळें द्वारका आतां सुवर्ण-नगरी झाली आहे.

**रुक्मिणीः**—चंद्रेश्वरा, तुम्ही आनंदाची बातमी सांगितली म्हणून तुम्हांला मी द्वारकेस तेथें सुवर्णाचें घर बक्षीस देईन.

**स्नेहलताः**—आणि मला ग रुक्मिणी?

**रुक्मिणीः**—तुला हिऱ्यामोत्यांचें घर बक्षीस देईन; झालें?

**स्नेहलताः**—ह्यांना सोन्याचें, मला हिऱ्यामोत्यांचे, आणि तूं ग कोठें रहाणार?

**रुक्मिणीः**—द्वारकेस प्रेमाचे घरांत, श्रीकृष्णाचे प्रेममंदिरांत.

**पद ३७** (राग—जंगला, ताल—पंजाबी, 'काहेरी ननदिया' या चालीवर.)

**करीन यदुमनीं सदना, रुचिर सदन पति—मन सतींना ॥ धृ०॥**

**अशुभ मणीमय भुवन अबलांना, जरी नाथ रमेना ॥ १ ॥**

स्नेहलते, ह्या चंद्रेश्वराला आईकडे ने, आणि म्हणावें ह्यानें आनंदाची बातमी आणली तेव्हां ह्याचे मुखांत आज गोड साखर घातली पाहिजे.

[ दिनेश्वर येतो ]

**दिनेश्वरः**—आणि माझ्या मुखांत ताईसाहेब?

**स्नेहलताः**—तुझ्या तोंडांत माती.

**दिनेश्वरः**—गप बैस.—ताईसाहेब मीहि आनंदाची बातमी आणली आहे. आणली आहे म्हणण्यापेक्षां वर्तिविली आहे—जें भविष्य आतां सांगणार आहे तें एकून ताईसाहेब खूष झाल्याच पाहिजेत.

**रुक्मिणीः**—कोणतें भविष्य वर्तविलें आहे?

**दिनेश्वरः**—दुसरें कोणतें! शिशुपाल व रुक्मी दोघेहि आतांच कुंडिनपुरांत आले; मी स्वतः डोळ्यांनीं पाहिले; महाराजांचे दर्शनास ते गेले; आणि हें भविष्य ताईसाहेबांजवळ वर्तविण्याकरितां मी येथें आलों.

**स्नेहलताः**—आपलें हें भविष्य, नव्हे—भूत—आपलें हें भूत—पिशाच्च दुसरीकडे कोठें गाडलें असतें तर नसतें का चाललें?

**रुक्मिणीः**—चल स्नेहलते, ज्या संकटाला मी भीत होतें तेंच संकट आलें.—श्रीकृष्णा, आपण द्वारकेहून येथें येण्यापूर्वी आपले शत्रू येथें कसे आले ?

**दिनेश्वरः**—कसे आले म्हणजे ? रथांतून आले. मीं वर्तविलें होतें रथाला चार चाकें असतील, आणि चार घोडे जुंपले असतील. आई साहेबांच्यापाशीं प्रश्न—कुंडली पाहून मी सांगतों, तों शिशुपालाच्या रथाला चार चाकें ! रुक्मीच्या रथाला चार चाकें ! शिवाय चार चार घोडे ! घोड्यांचा रंग कोणता, सारथ्यांचा पेहराव कसला, ध्वजा कोठें लावली होती—खडा न् खडा भविष्य बरोबर ! पाहायचें आणि सांगायचें, पाहायचें आणि सांगायचें, पाहायचें आणि सांगायचें; खडा न् खडा भविष्य बरोबर !

**रुक्मिणीः**—स्नेहलते, चल, बाबांच्या दर्शनाला आपण जाऊं.—मला माझ्यापेक्षां बाबांचें काय होईल ह्याचीच अधिक भीति वाटते. कंसाप्रमाणें दादा बाबांना तर कारागृहांत टाकणार नाहींना ? ह्या दिनेश्वराप्रमाणें पुढचें भविष्य जर माझ्याहि मनाला आगाऊ कळलें नसतें, डोळ्यांनीं पाहत असलेल्या वस्तूवरच जर माझें मन मला गुंतवून ठेवतां आलें असतें,—जगदंबे, ह्या दिनेश्वराचीं सगळीं भविष्यें जशीं खोटीं ठरतात, त्याप्रमाणें पुढच्या गोष्टीसंबंधानें माझ्या मनाला लागलेली हुरहुर निराधार ठरीव.

[ स्नेहलता व रुक्मिणी जातात.

**दिनेश्वरः**—मुला, चंद्र्या, राजकन्येला तूं काय सांगत होतास ? माझीं भविष्यें खोटीं ठरतात म्हणून सांगत होतास काय ?

**चंद्रेश्वरः**—नाहीं बाबा, मीं कांहीं तसें सांगितलें नाहीं; मीं नुसतें सांगितलें श्रीकृष्ण खुशाल आहेत.

**दिनेश्वरः**—खुशाल आहेत म्हणून सांग; त्याला हरकत नाहीं. खुशाल नाहींत, असें मीं भविष्य वर्तवलें नव्हतें.

**चंद्रेश्वरः**—त्यांनीं द्वारकेस नवी राजधानी स्थापिली,—

**दिनेश्वरः**--हां ! हां ! तसेंहि सांगावें. त्यांनीं द्वारकेस राजधानी स्थापिली नाहीं, असेंहि मीं भविष्य वर्तवलें नाहीं.

**चंद्रेश्वरः**--द्वारकेची फार भरभराट झाली असून--

**दिनेश्वरः**--हो हो, होईल भरभराट, कां होणार नाहीं ? द्वारकेची भरभराट होणार नाहीं, असें मीं भविष्य वर्तविलेंच नाहीं. मुला, तुझें आणि माझें भविष्य तंतोतंत जुळतें, आणि मग मी खोटा कसा ?

**चंद्रेश्वरः**--श्रीकृष्ण जळले--

**दिनेश्वरः**--हेंहि प्रथम मींच भविष्य वर्तविलें.

**चंद्रेश्वरः**--नाहींत, जळले नाहींत.

**दिनेश्वरः**--खबरदार, असें मी बोलूं देणार नाहीं; शिशुपाल आणि रुक्मी परत आले आहेत; त्यांच्याविरुद्ध असलें भविष्य कोण बोलूं देणार ? तुला तारतम्यज्ञान नाहीं म्हणून मी म्हणतों तें हेंच. भविष्य नेहमीं आजूबाजूला पाहून वर्तवावें; आणि रुचेल व स्वतःला पचेल तेंच सांगावें. तूं तारे पाहून, ग्रह पाहून भविष्य वर्तवितोस; मी मागें पुढें खालीं वर चोहोंकडे पाहून भविष्य वर्तवतों. प्रश्न विचारणाऱ्याचा चेहरा पाहून भविष्य वर्तवतां आलें पाहिजे; आणि तें तर सर्वांत कठिण--शिशुपाल व रुक्मी आले आहेत, तेव्हां श्रीकृष्ण जळालाच असला पाहिजे. जिवंत असेल, त्याची भरभराट झाली असेल, पण जळाला नाहीं हें मात्र नाकबूल--समजलास, चंद्रय्या, आतां शिशुपाल आणि रुक्मी आले आहेत; श्रीकृष्ण जळाला नाहीं, असें बोललास तर तुला आणि मला दोघांनाहि जिवंत जाळतील ! तेव्हां मुला नीट ध्यानांत ठेव. माझेंच भविष्य खरें--तुझ्याहून पंचवीसतीस पावसाळे अधिक घालविले आहेत. आतांचा योगच असा आहे. श्रीकृष्ण खुशाल जिवंत असो, सर्वांनीं माझेंच भविष्य खरें मानलें पाहिजे. कारण दोन महारथी--अतिरथी--शिशुपाल रुक्मी--ह्या दोन वीरांची जोडी माझ्या भविष्याला जोडलेली आहे. [ जातात.

## प्रवेश तिसरा

[ शिशुपाल व रुक्मी येतात. ]

**शिशुपालः**—आपण दहा महिन्यांतच कुंडिनपुरास परत आलों, म्हणून सर्वांस विस्मय वाटत असेल, नाहीं ?

**रुक्मीः**—कृष्णाच्या बलाविषयींचा बाबांचा भ्रम एव्हांना नाहींसा झाला असेल, आणि कृष्णदहनाची हकीकत ऐकल्यावर रुक्मिणीला आपणांला देण्याला ते तेव्हांच कबूल होतील. शिशुपाल महाराज, गेल्या हिंवाळ्यांत सर्व जुनीं पानें गळून पडलीं असून आजच्या ह्या वसंतकाळचे प्रारंभाला नवीं पानें जुन्या वृक्षांनाहि आलीं आहेत; त्याप्रमाणें बाबांच्या मनांतील जुने विचार गळून पडले असतीलच आणि आपणाविषयींच्या नव्या अंकुराला जोर आला असेल.

**शिशुपालः**—आपण म्हणतां तसेंच झालें असेल; झालें असेल काय, झालेंच आहे. हे पहा महाराज आले. महाराणीसाहेबहि बरोबर आहेत; त्यांच्या चेहऱ्यावर माझ्याविषयीं आतां पूर्वीचा तिटकारा दिसत नसून—

**रुक्मीः**—आपलें स्वागत करावयाला ते उत्सुक दिसत आहेत.

**पद ३८** ( राग–खमाज, ताल–दादरा; ‘ सुगरपिया प्यारीके ’ या चालीवर.)

**जनक नव सुखासि दावी मनाला अनल नेत्रीं निवाला ॥ धृ० ॥ सकल आप्त सुखी कराया विजय सांगूं रणींचा तयाला ॥ १ ॥ विजयसौख्य–जलें करुंया मृदुल लोल कठोरा कणाला ॥ २ ॥**

[ भीष्मक व महाराणी येतात. मथुरेच्या युद्धांत विजयी झालेला हा रुक्मी मातापितरांच्या चरणीं प्रणाम करीत आहे.

**महाराणीः**—मुला, नेहमीं तुझा असाच विजय होवो.

**शिशुपालः**—प्रतिस्पर्ध्याला आगींत जाळून विजयी झालेला महाराजांचा हा भावी जामात प्रणाम करीत आहे.

**महाराणीः**—आप्तेष्टांचें कल्याण करण्याची शक्ति आपल्या विजयी बाहूंत नेहमीं नांदो.

**शिशुपालः**—आप्तेष्टांचें कल्याण मीं ह्यापूर्वींहि केलें आहे आणि पुढेंहि करीन, असें आश्वासन कृतीनें ह्या मंगलसमयीं देण्याचा मीं संकल्प केलेला आहे. तो माझा संकल्प ह्या वेळीं मला पुरा करूं द्या.—महाराज, सम्राटाच्या सेनापतीचा हा माझ्या मस्तकावरील मुकुट मी आपणांपुढें ठेवीत आहें. आपण आपल्या हातांनीं हा माझ्या स्नेह्याचे मस्तकीं ठेवावा व मला कृतकृत्य करावें.

[ मुकुट भीष्मकाचे हातीं देतो. ]

**भीष्मकः**—शिशुपालमहाराज, शौर्याप्रमाणें आपलें औदार्यहि मोठें आहे; पण माझ्या मुलीचें पाणिग्रहण केल्यानंतर हा मुकुट रुक्मीच्या मस्तकावर आपण ठेवणार होतां, तशी प्रतिज्ञा आपण केली आहे. तेव्हां आज हा मुकुट आपल्याच मस्तकीं असणें योग्य आहे.

[ शिशुपालाच्या मस्तकीं मुकुट ठेवूं लागतो.

**शिशुपालः**—नाहीं महाराज, तसें नाहीं. पूर्वीच्या प्रतिज्ञेला अनुलक्षून हा मुकुट मीं आपल्या हवालीं केलेला नाहीं. कृष्णाला पळायला लावून वनांत त्याला घेरून, आगींत जाळण्याचे कामीं रुक्मीनें जो पराक्रम दाखविला, त्या पराक्रमामुळें ह्या मुकुटावर रुक्मीचाच हक्क सिद्ध झाला आहे. योग्य जागीं मी हा मुकुट ठेवीत आहें; ह्यांत औदार्य कसलें? आणि ह्याबद्दल मी राजकन्येचा मोबदला तरी कसा मागूं? रुक्मीच्या मस्तकावर आपण हा मुकुट ठेवलांत म्हणजे रुक्मी सम्राटाचा सेनापति होऊन जरासंधाचे मागून सम्राटपदावर रुक्मीचाच हक्क लागू होईल.

**महाराणीः**—ठेवायचा होता रुक्मीच्या मस्तकावर तो मुकुट; साम्राज्यपद घरीं चालून येत असतांना आढेवेढे कसले घ्यावयाचे ?

**भीष्मकः**—पण रुक्मिणीनें शिशुपालमहाराजांच्या गळ्यांत माळ घालाबचें नाकारलें तर ? स्वयंवराच्या त्या गोष्टी तशा घडून आल्यानंतर मी कोणत्या तोंडानें रुक्मिणीला म्हणूं कीं, श्रीकृष्णाला सोडून इतरांबरोबर लग्न कर म्हणून ?

**शिशुपालः**—ह्या मुकुटाचा मोबदला म्हणून मी आपली मुलगी आपणापाशीं मागत नाहीं. गेल्या दहा महिन्यांत रणभूमीवर कृष्णाला आम्ही जिवंत जाळलें, आणि कृष्ण–दहनाबरोबर स्वयंवराच्या वेळच्या तशा त्या गोष्टी जळून खाक झाल्या.

**रुक्मीः**—कृष्णाला रणभूमीवर जिवंत जाळून विजयी झालेल्या शिशुपाल महाराजांना स्वयंवराच्या वेळच्या तशा त्या हकीकतींनेंच रुक्मिणीला देऊन टाकलेलें आहे.—सामर्थ्यवान महावीर या नात्यानें रुक्मिणीचें हरण करण्यास शिशुपालमहाराज आज येथें आले आहेत. जो वीर बाहुबलाचेच जोरावर रुक्मिणीला जबरदस्तीनें येथून घेऊन जाणार, त्याला आपण होऊन आपली मुलगी देऊन त्याच्या शौर्याचा गौरव करणें योग्य नाहीं काय ?—कृष्णदहनाचे वेळींच रुक्मिणी शिशपालाची झाली. आतां लग्नविधि तेवढा आपल्या हातीं राहिला आहे.—कृष्ण नाहींसा झाला—कृष्ण मेला—कृष्ण जळाला——

**भीष्मकः**—श्रीकृष्ण जिवंत असून तो द्वारकेचा राजा झाला आहे.

पद ३९ (राग–पिलु, ताल–पंजाबी. 'पीकि बोलिना बोल' या चालीवर.)

**बोल होईल फोल, अनुभवानें ।। धृ० ।। यदु गेला अजि निज**
**द्वारकेला, करि बंध सिंधु विलोल ।। १ ।।**

श्रीकृष्ण जिवंत आहे इतकेंच नव्हे, तर स्वतःच्या राज्याचा राजा झाला आहे.

**रुक्मीः**—जिवंत आहे, ह्या नुसत्या अफवा आहेत. मथुरेस आम्ही त्या ऐकल्या होत्या, नाहीं असें नाहीं. गोकुळच्या कांहीं वेड्या गवळ्यांची समजूत बाबा, तुमच्याप्रमाणेंच आहे. पण मी म्हणतों, जिवंत असला तरी काय उपयोग ? आमच्या सैन्यांसमोरून तो पळून तर गेलाना ? चार महिने आम्ही यादवांचा पाठलाग करीत होतों आणि चार महिने मथुरेस तळ देऊन बसलों होतों. जिवंत असता, राजा झाला असता, तर तोंड कां लपविलें असतें ? रणांगणावर जो शत्रूला पाठ दाखवितो, तो जिवंत कसला, क्षत्रिय कसला, राजा कसला ? जिवंत असला तरी मेल्यासारखाच.—राजा झाला आहे म्हणे राजा ! निवडुंगाच्या वनाचा व समुद्रकांठच्या खडकाचा राजा व्हावयाला काय लागतें ? खाऱ्या पाण्याच्या चार घागरी डोक्यावर ओतून घेतल्या म्हणजे कोणतेंहि डुक्कर राजा होतें; राजा झाला आहे राजा !

**भीष्मकः**—मुला, तें कसेंहि असो, पण श्रीकृष्ण जिवंत असतांना, यादवांची सेना त्याच्याभोंवतीं उभी असतांना, द्वारकेचा राजा म्हणून यादववीर त्याला प्रणाम करीत असतांना, मी रुक्मिणीचा हात शिशुपाल-महाराजांचे हातांत देऊं शकत नाहीं. तेव्हां हा मुकुट तुझ्या मस्तकावर ठेवून खोटें काम मी कसा करूं ?—महाराज, आपल्या मस्तकावर हा मुकुट मला ठेवूं द्या.

**महाराणीः**—हें काय तें ? घरी चालून आलेली सम्राटपदाची राजलक्ष्मी अशी मागें का कोणी लोटतो ?-अगोदर मुलीला तरी विचारा, ती काय म्हणते तें.—शिशुपालमहाराजांना वरायचें नाहीं, अशी तरी प्रतिज्ञा तिनें कोठें केली आहे ?—माझी मुलगी शहाणी आहे हो शहाणी ! खात्रीनें कांहीं तरी तोड ती काढील, आणि हा मुकुट रुक्मीच्या मस्तकावर ठेवील.

**भीष्मकः**—बरें तसें कां होईना.—शिशुपालमहाराज, हा मुकुट मी रुक्मिणीपुढें ठेवतों; तिनें आपणाला वरण्याचें वचन दिलें तर रुक्मी हा मुकुट धारण करील, नाहीं तर हा मुकुट मी आपणाकडे परत पाठवीन.

**रुक्मीः**--कांहीं हरकत नाहीं. चला बाबा, असेच्या असे मजबरोबर रुक्मिणीकडे चला.-मित्रा, तुझें व रुक्मिणीचें लग्न ठरलें म्हणून कुंडिनपूर-भर घटका दोन घटकांनीं हत्तीवरून साखर वांटून टाकूं.

[ रुक्मी, भीष्मक व महाराणी जातात.

**शिशुपालः**--आतां लग्न ठरायला आडकाठीच राहिलेली नाहीं-रुक्मिणीनें तो मुकुट पाहिला कीं तेव्हांच रुकार देईल. बायकांची जात लहानापासून थोरापर्यंत एक नमुन्याची. मुकुट पाहून आईप्रमाणें मुलगीहि चळलीच पाहिजे.

---

## प्रवेश चवथा.

---

[ रुक्मिणी मुकुट हातांत घेऊन उभी आहे. ]

**रुक्मिणीः**--ह्या मुकुटाची लालूच दाखवून माझें मन वश करूं पहात आहेत! ज्यांच्या चरणाच्या धुळींतून असले मुकुट उगवतात, त्यांना सोडून शिशुपालाकडे ह्या मुकुटामुळें माझें मन कसें वळेल?

**पद ४०** ( राग-बागेश्री, ताल-त्रिवट. 'कोन गत भइ' या चालीवर.)

**प्रेम नच जाई तेथें, जिवासी जीव न जडे जेथें ॥ धृ० ॥ अनु-**
**सरतांना जडतें नातें; जीवा जीव एक कार्य भेटवीतें ॥ १ ॥**

त्यांच्या चरणाचे धुळीच्या कणाला जितकी किंमत मी देतें, तितकीहि किंमत ह्या सर्व हिऱ्यांना मला देववत नाहीं. [ भीष्मक येतो.

**भीष्मकः**--बाळे, तुझ्या भावानें हट्ट घेतला आहे कीं सम्राटपदाला नेऊन चढविणारा हा मुकुट तूं तुझ्या हातानें त्याच्या मस्तकावर ठेवावास आणि शिशुपालाशीं लग्न करण्यास कबुली द्यावीस.

**रुक्मिणीः**--बाबा, माझें स्वयंवर ज्या वेळीं मीं होऊन मोडलें त्या वेळीं ह्याला वरणार किंवा त्याला वरणार असें म्हणण्याचा माझा हक्कहि

गेला !—आपणांस जो योग्य वर वाटेल त्याला मला देऊन टाकण्यास आतां आपण समर्थ आहां, आपण जसें सांगाल तसें मी ऐकेन.

**भीष्मकः**——मुली, तूं असें बोलूं लागलीस म्हणजे हृदय भडभडून येतें !—'तुम्ही जसें सांगाल तसें ऐकेन.'—मुली, माझे सर्व अधिकार तुला प्राप्त झाले आहेत; तुझ्या शहाणपणानें ते सर्व अधिकार तूं मिळविले आहेस. मी सांगायाचे ऐवजीं तूं जसें सांगशील तसें मी ऐकेन. सांग, शिशुपालाशीं तुला लग्न करायचें आहे काय ?

**रुक्मिणीः**——बाबा, मी काय उत्तर देऊं ? लाजलज्जा एका बाजूला ठेवून स्वयंवराचे मंडपांत मला जें कांहीं सांगावयाचें होतें तें मीं बोलून दाखविलेंच आहे. आपल्या पायापाशीं माझें सांगणें आतां एवढेंच आहे, मला कोणाला द्यावयाची हें ठरविण्याचा अधिकार ह्या वेळीं आपला आहे.

**भीष्मकः**——मुली, स्वयंवराच्या सर्व अधिकारावर तूं त्यावेळीं पाणी सोडलेंस खरें, पण माझ्या डोळ्यांपुढें ती सर्व हकीकत मूर्तिमंत उभी राहिली आहे. बाळे, तसल्या स्वार्थत्यागानें तूं सोडलेले सर्व अधिकार पुन्हां जसेच्या तसे तुझ्याकडेंच आले आहेत !—बाळे, तुझ्या स्वयंवराच्या मंडपांत आम्ही सर्व म्हातारे अप्रबुद्ध ठरलों, तुझ्यापुढें सर्व वीर बलहीन ठरले, आणि प्रत्यक्ष श्रीकृष्ण तुझ्या आज्ञेप्रमाणें वागत आहेसें दिसलें ! श्रीकृष्णाला दैवी अवतार मानणाऱ्या यादवांनींहि सृष्टीचे व्यापार चालवितांना जिच्या मुठींत अडकून पडण्यांत परमेश्वराला आनंद वाटतो ती आदिमाया तूं असली पाहिजेस, असे उद्गार काढले ! मलाहि तसेंच वाटतें; कारण——

पद ४१ (राग—सिंधुरा, ताल—धमार; 'नादय्यामे' या चालीवर.)

**ईश घेई अवताराला; तव प्राणसखा भूवरि, देखा, सजला रणाला ॥ धृ० ॥ जरि न शक्ति ठाकली निकटिं, जय कैसा येइल तयाला ॥ १ ॥**

रुक्मिणी, बापलेकीचें नातें एका बाजूला ठेवून मी तुला खरें खरें सांगत आहें. मला वाटतें श्रीकृष्ण विष्णूचा अवतार असून महालक्ष्मीच माझी मुलगी आहे.

**रुक्मिणीः**--बाबा, ही काय भलतीच स्तुति !--ते अवतार आहेत, हें खरें; पण मी--मी त्यांच्या परसांतली पत्रीहि होण्यास योग्य नाहीं.

**भीष्मकः**--नाहीं, मुली, तसें नाहीं; तूं महालक्ष्मीचाच अवतार असली पाहिजेस--

**रुक्मिणीः**--नका बाबा, असें बोलूं नका !--दादानें हें जर ऐकलें तर तो रागानें लाल होईल.

**भीष्मकः**--होईना लाल ! तुम्ही दोघेहि अवतार असून तुमचा छळ करणारे जरासंध, शिशुपाल, रुक्मी हे दैत्य-- [ रुक्मी येतो.

**रुक्मीः**--आम्ही दैत्य ! तो गवळी देव, आणि ही चुरूचुरू बोलणारी जीभ देवी !--मी रागानें कां लाल होऊं नये ?--अवतारी पुरुष म्हणवून घेण्याचा जर अधिकार कोणास प्राप्त झाला असेल तर तो एक मला किंवा शिशुपालाला--बाबा, तुम्ही हिला महालक्ष्मीचा अवतार समजतांना ?

**भीष्मकः**--होय, मी हिला महालक्ष्मीचा अवतार समजतों, व श्रीकृष्णाला विष्णूचा अवतार समजतों.

**रुक्मीः**--असले अवतार मी केराच्या कोपऱ्यांत झाडून टाकीत असतों, समजलांत ?--रुक्मिणी, तुझी योग्यता शिशुपालाच्या घरीं केराच्या कोपऱ्यांत पडून राहणाऱ्या बटकीहून अधिक नाहीं. तुझें महाभाग्य म्हणून तूं माझी बहीण झालीस; नाहीं तर लग्नसंस्काराचा टिळाहि तुझ्या कपाळीं लावण्यास शिशुपालमहाराज तयार झाले नसते. बाबा, हिला मी शिशुपालाला देऊन टाकणार, तुमची हरकत आहे ?

**भीष्मकः**--रुक्मिणीच्या इच्छेविरुद्ध मी कांहींहि करणार नाहीं.

**रुक्मीः**--स्वयंवर मोडलें त्याच वेळीं हिची इच्छा मोडली ! रुक्मिणी, शिशुपालाशीं लग्न करण्यास बऱ्या बोलानें कबुली देतेस का--

**रुक्मिणीः**--दादा, कबुलीची काय जरुरी आहे ? जबरदस्तांनीं दुसऱ्याच्या इच्छेकडे कशाला पहावें ?

**रुक्मीः**--कारण आहे; रुक्मिणी, बाबांच्या संमतीनें तुझें लग्न शिशुपालमहाराजांशीं थाटानें करून सर्व दुनियेची मी खात्री करणार आहें--सर्व राजांस कुंडिनपुरास बोलावून तुझ्या लग्नाचे वेळीं मी त्यांच्या तोंडून वदविणार आहें,--सर्व आबालवृद्धांना तुझ्या लग्नसमारंभाचे वेळीं मी ऐकविणार आहें,--कृष्णानें कंसवध केला हें मोठें पाप केलें आणि शिशुपाल व रुक्मी ह्या अवतारी पुरुषांनीं तें पातक धुवून टाकून भूभार हलका केला !

**रुक्मिणीः**--भूभार जड केला दादा, तुम्ही भूभार जड केला !

**रुक्मीः**--जड होवो वा हलका होवो, मला बाबांची संमति पाहिजे.

**रुक्मिणीः**--आणि त्यांनीं नाहीं दिली तर ?

**रुक्मीः**--नाहीं दिली तर त्यांना कैदेंत टाकून विदर्भदेशाचा राजा मी होईन; सवाई कंस कृष्णाला पुरून उरला आहे, हें सर्वांना पटविण्याकरितां मोठ्या थाटानें शिशुपालाशीं तुझें मी लग्न लावीन.--कंस मेला नसून, सवाई वाढला आहे; समजलीस रुक्मिणी, कंस सवाई झाला आहे.

पद ४२ ( राग--परज, ताल--त्रिवट; 'पवन चलसि' या चालीवर. )

**अमर अजर वपु--धर कंस मीच, अवतारचि ठाकलों समरीं; चुरडिन यदुवर प्रियकर तुज जरि ॥ धृ० ॥ क्रोधें लाल होत काळ, बघ आलों अजि भूवरि, कपट--पटु अरि पुनरपि असु न धरि ॥ १ ॥**

कंसवधाची भरपाई ह्या कृत्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि कृत्यानें होणार नाहीं.--बाबा, कैदखाना पत्करतां का रुक्मिणी शिशुपालाला देऊन

टाकतां ? [ टाळी वाजवितो; चार जवान येतात. ] मी कुंडिनपुरचा राजा आहें, मी विदर्भदेशाचा राजा आहें, मी सम्राटाचा सेनापति आहें, [ सेनापतीचा मुकुट मस्तकावर स्वतः ठेवतो. ] सम्राट जरासंधमहाराज ह्यांचा सेनापति तुम्हांला हुकूम करीत आहे, ह्याला कैद करा. [ भीष्मकाला धरतात. ] बाबा, कैदखाना पत्करतां, का रुक्मिणी शिशुपालाला देऊन टाकतां ? रुक्मिणी, बाबा कैदेंत पडूं देत का तूं स्वतः शिशुपालाशीं लग्न करण्यास तयार होतेस ? बाबा, कैदखाना पत्करतां का रुक्मिणी शिशुपालाला देऊन टाकतां ?

**भीष्मकः**—मुला, तुझ्या कैदेंत पडण्याचें माझ्या नशिबी आलें तरी रुक्मिणीच्या इच्छेविरुद्ध मी तिला शिशुपालाला देणार नाहीं.-न्या, मला माझ्या कैदखान्याकडे न्या; रुक्मिणी, तुझ्या इच्छेविरुद्ध तूं शिशुपालाला वरावेंस असें माझें तुला सांगणें नाहीं.

**रुक्मी**—न्या, त्याला कैदखान्याकडे न्या, न्या म्हणतोना येथून ?

( जवान नेऊं लागतात. )

**रुक्मिणीः**—थांबा, जरा थांबा.—दादा, तुला सम्राट-पदाची इच्छा आहे, एवढेंच ना ?—मी त्यांच्याकडून—श्रीकृष्णाकडून—द्वारकाधीशाकडून तुला सम्राट करण्याची शपथ घेवविली तर ? अरे, माझें व त्यांचें लग्न झाल्यावर जगांतली कोणती श्रीमंती, कोणता मान, कोणतें पद तुला मिळण्यासारखें नाहीं ? सर्व पुरुषार्थाचा उगम त्यांच्यापासून, आणि सर्व संपत्तीचा उगम माझ्यापासून; मी तुला साम्राज्य-पद देतें; जरासंधाच्या सिंहासनावर मी तुला नेऊन बसवितें; आणि तुझ्या मस्तकावर सर्व राजांना चौऱ्या वारावयाला मी लावतें. स्वतः श्रीकृष्ण तुझ्या चरण-कमलाच्या स्पर्शानें आपला मुकुट भूषित करून घेतील.—दादा, विश्वांतील सर्व सौंदर्याचें व लक्ष्मीचें वसतिस्थान आपण आहों असा जिला आत्मविश्वास वाटत

आहे, ती ही तुझी बहीण श्रीकृष्णाच्या मदतीनें साम्राज्यपद मिळविण्यास तुला विनंति करीत आहे.

पद ४३ (राग-पुरिया धनाश्री, ताल तिताला, 'अबतो ऋतमामी' या चालीवर.)

**तुजला कर माझा, आज करि त्रिभुवन-राजा ॥ धृ० ॥ पद धरी मी महालक्ष्मी** [ लाथ मारतो ] **तुझी लाथ मळवी कुल-काजा ॥ १ ॥**

दादा, श्रीकृष्ण वीरमणि नाहींत असें का तुला वाटतें ? स्वपतीकडून स्वजनांचा योग्य उत्कर्ष करविण्याला लागणारे स्त्रियांचे सद्गुण माझ्या अंगीं नाहींत असें का तुला वाटतें ?

**रुक्मीः**—ताई, तसें नाहीं. श्रीकृष्ण वीर पुरुष आहे हें मी कबूल करतों; जरासंध, शिशुपाल किंवा मी, आम्हां तिघांपैकीं कोणाच्याहि तोडीचा तो योद्धा आहे, हें मी जाणून आहें; आणि स्वतःचे पतीस मुठींत ठेवावयास लागणारे सद्गुण तुझ्या अंगीं आहेत, हेंहि मी ओळखून आहें. पण रुक्मिणी, कंसवध करून कृष्णानें चूक केली, पातक केलें, जगाच्या निंदेस तो पात्र झाला—हें स्थापित केल्याशिवाय, आम्हां तिघांपैकीं कोणासहि चैन पडावयाचें नाहीं. जगाकडून आम्ही त्याची निर्भत्सना करविणार; आम्ही त्याचा पराभव तर केलाच आहे; पण दुनियेंत त्याची छीः थूः होण्यास, रुक्मिणी, तूं शिशुपालाचीच बायको झाली पाहिजेस. तुझी संमति नाहीं, तेव्हां बाबांना तुरुंगांत गेलें पाहिजे; मी कुंडिनपुराचा राजा झालोंच पाहिजे; आणि शिशुपालाची बायको म्हणून तुझी मिरवणूक काढून आबालवृद्धांना कृष्णाच्या नांवाचा धिक्कार करावयाला लावलें पाहिजे.

**भीष्मकः**—रुक्मी, सज्जनांचा असा द्रोह करून कोणच्या पातकांचे घडे भरून ठेवीत आहेस ?

**रुक्मी**:—बाबा, मला शिव्याशाप देऊन काय उपयोग ? विदर्भदेशाची सत्ता, जरासंधमहाराजांच्या साम्राज्याची सत्ता माझ्या हातांत आहे, आणि तुम्हांला, रुक्मिणीला, कृष्णाला, सर्व जगाला शिशुपाल व रुक्मी हे नर-नारायणाचे अवतार असून असल्या वीरांची जोडी पूर्वी झाली नाहीं व पुढें होणार नाहीं, असें बोलावयास लावल्याशिवाय माझें मन शांत होणार नाहीं.

**भीष्मकः**—अरे तुम्ही दैत्याचे अवतार—

**रुक्मी**:—न्या म्हणतोंना याला कैदखान्याकडे.—रुक्मिणी, तूं आतांच्या आतां तुझ्या आईबरोबर शिशुपालमहाराजांच्या गोटांत रहावयास गेलें पाहिजे.

**रुक्मिणी**:—दादा, हें काय ? हें काय ?

**रुक्मी**:—शिशुपालमहाराजांनीं जबरदस्तीनें तुझें हरण केलें आहे, समजलीस ? महिन्या दोन महिन्यांनीं सर्व राजांना गोळा करून कृष्णाची निंदा चोहोंकडे व्हावी म्हणून मी तुझ्या लग्नाचा थाटाचा समारंभ करणार आहे, इतकेंच; पण ह्या क्षणींच शिशुपालमहाराजांनीं तुझें हरण केलें आहे, समजलीस ?

**भीष्मकः**—वारे भाऊ ! वारे भाऊ ! वारे पुत्र ! वारे पुत्र !

**रुक्मी**:—न्या म्हणतोंना ह्याला येथून ? न्या, एकदम त्या कैदखान्याकडे, एकदम न्या.

**रुक्मिणी**:—थांबा जरा थांबा.—दादा, बाबांना बंधमुक्त कर. माझ्या म्हणण्याप्रमाणें थोडेसें वागत असलास तर तूं सांगशील त्याच्या गळ्यांत माळ घालण्यास मी तयार आहें, बाबांना बंधमुक्त कर.

**भीष्मकः**—हें काय रुक्मिणी ? माझा बंदिवास चुकविण्याकरितां तूं जन्माचा नरकवास कां पत्करतेस ?

**रुक्मी**:—बाबा, आतां हिच्या कबुलीवर कोठें अवलंबून आहे ? ह्या क्षणापासून हिचें हरण शिशुपालानें केलें आहे.; ह्या क्षणापासून केलें आहे.

**भीष्मकः**---जबरदस्ती शरिरापुरती असते; मुली मनानें तूं कां हलकी होतेस ? माझा बंदिवास चुकविण्याकरितां निदान तूं तशी होऊं नकोस.

**रुक्मिणीः**---बाबा, आपण इतके श्रेष्ठ आहांत कीं, आपलें पुण्य मज- सारख्या लाखों पतितांचीं पातकें सहज धुऊन टाकील ! माझ्या हातून आपली अल्पस्वल्प तरी सेवा ह्या वेळीं घडूं द्या.--दादा, स्वयंवराचे मंडपांत तुझें ऋण फेडण्याकरितां--स्वकीयांचें ऋण फेडण्याकरितां--श्रीकृष्णाच्या गळ्यांत मी माळ घातली नाहीं. दादा, आज बाबांचें ऋण फेडण्याकरित मी ह्या लग्नास माझी संमति एका अटीवर देतें.

**भीष्मकः**---मुली, तूं हें काय आरंभिलें आहेस ?

**रुक्मिणीः**---एका अटीवर मी संमति देतें.

**रुक्मीः**---कोणती अट बोल.

**रुक्मिणीः**---दोन महिन्यानंतर लग्नाचा मुहूर्त धरा व आजचे आ लग्नचिठ्ठी द्वारकेस रवाना करा; ह्या दोन महिन्यांत त्यांनीं माझें हरण के तर ठीक, नाहीं तर---

**रुक्मीः**---तूं शिशुपालाला वरशील ? आमची स्तुति करशील ? कृष्णाची निंदा करशील ?

**रुक्मिणीः**---तसल्या त्या लग्नानंतर वाचेंत शक्ति उरली तर तुमच स्तुति व इतरांची निंदा मी नेहमीं करीन.--दादा, माझी अट कबूल क आणि बाबांना बंधमुक्त कर. [ शिशुपाल येतो.

**शिशुपालः**---भीष्मकमहाराजांना बंधमुक्त केलें आहे. ह्या त्रैलोक्य सुंदरीच्या आज्ञेनें पूर्वीप्रमाणेंच ह्यापुढेंहि आपण विदर्भदेशाचे राजे आहां,- मित्रा, हिची अट मला मान्य आहे.--महाराज, हें लग्न ठरलें, आपण आत खुशाल आरामस्थानीं विश्रांति घ्या.

**भीष्मकः**---आराम आणि बंदिवास, दोनहि मला आतां सारखीं आहेत. [ भीष्मक व जवान जातात

**शिशुपालः**--मित्रा, हें लग्न ठरलें. मुहूर्त कायम करून आतांच्या आतां मी द्वारकेस कृष्णाकडे लग्नचिठ्ठी पाठवितों. हें लग्न ठरलेंना ?

**रुक्मीः**—ताई, हें लग्न ठरलें ना ?

**रुक्मिणीः**—माझी ना नाहीं; त्यांना कळवून दोन महिने झाल्यावर माझी ना नाहीं.

**रुक्मीः**—ठरलें, हें लग्न ठरलें. येऊं दे, कृष्ण द्वारकेहून विदर्भदेशांत येऊं दे; कुंडिनपुरांत त्याची चिता रचण्यांत येईल.

**शिशुपालः**--ठरलें; हें लग्न ठरलें. मित्रा, लग्नानंतर मी तुझ्या बहिणीला इतक्या सुखांत ठेवीन कीं, आजचा तुझा कठोरपणा ती तेव्हांच विसरून जाईल.

**रुक्मीः**—आणि शिशुपाल व रुक्मिणी प्रेमानें नांदत आहेत असें पाहून देवलोकांतहि गंधर्व आपल्या स्तुतीचीं व कृष्णाच्या निंदेचीं गाणीं गातील.

[ शिशुपाल व रुक्मी जातात.

**रुक्मिणीः**—स्वजनांचें देणें मीं दिलें; पितृऋण मीं फेडलें; माझ्या ह्या शरीराचें देणें तेवढें बाकी आहे.—शरीरा, श्रीकृष्णाचे सहवासांत व सेवेंत तुला सुखी करण्याचें देणें मीं द्यावयाचें असेल, तर त्यांच्यावरील माझें निस्सीम प्रेम थोड्या अवधींत त्यांना येथें आणल्यावांचून राहणार नाहीं.—पण रुक्मिणी, तुझ्या शरीराचें देणेंच बाकी निघत नसेल—तर—शरीराला तूं सुखी करावेंस असें तुझें भाग्यच नसेल तर—तर—ते येणार नाहींत; हो येणार नाहींत. दैवच नसेल तर येणार नाहींत; आणि—मग,—शरीराचें जर मी देणें नसेल,—तर—माझा व शरीराचा संबंधच संपला ! हो, असेंच, असेंच, संबंधच संपला. दादाचें व बाबांचें देणेंपुरतें देण्याकरितां ह्या हातांनीं त्या वैऱ्याच्या गळ्यांत माळ टाकली,—लगेच शरीराचा संबंध संपला,—श्रीकृष्णावरील माझें प्रेम शरीराची व माझी तत्क्षणीं ताटातूट करील.

पद ४४ (राग-देस-जोगी-मिश्र, ताल-दीपचंदी–'जमुनाके तीर' या चालीवर.)

अवतार जीव घेत असे, कारण ऋण–दान जाण ॥ धृ० ॥
यांतही आडचि येतां पाप, मग जाळ पोळ भव–माया;
काया देत ऋणासि, मम जीव बळी देहा हा हा ह्या जाळी;
राख वरील नीच शिशुपाल ॥ १ ॥

[ पडदा पडतो.

## अंक तिसरा समाप्त.

---

# अंक चवथा



## प्रवेश पहिला.



[ स्नेहलता व दिनेश्वर प्रवेश करितात. ]

**दिनेश्वरः**---स्नेहलते, पाहिलेंस ? अखेर माझें भविष्य खरें ठरलें. ग्रहांचा हिडाखा हा असा आहे. परवां सायंकाळीं गोरज मुहूर्तावर शिशुपाल व रुक्मिणी ह्यांच्या मस्तकांवर लग्नाच्या अक्षता पडल्या म्हणून समज. मी प्रथमपासूनच महाराजांना म्हणत होतों ग्रह हे असे आहेत; स्वयंवराचे भानगडींत पडूं नका; पण ऐकलें नाहीं.—आतां तरी माझें ऐकून परवांचा मुहूर्त मुक्रर ठरविला, हें बरें झालें.

**स्नेहलताः**---मग काय परवांचे आंत श्रीकृष्ण येथें येऊन दाखल होतील असें म्हणतां ?

**दिनेश्वरः**---अग तो कृष्ण कुठला येतो ! त्यानें काळें तोंड केलें; त्याचे ग्रहच काळे आहेत; मी त्याची पत्रिका पाहूं लागलों एकहि ग्रह सांपडेना !— सगळ्या ग्रहांना ग्रहण लागलेलें ! काजळाच्या पेटींत मोती लपवून ठेवावेत त्याप्रमाणें पत्रिकेंत सर्व लपून बसलेले ! मीं ग्रहांना विचारलें; तुम्हीं असे दडून कां बसतां ? ते म्हणाले, कृष्णाचेपुढें आमचें कांहीं चालत नाहीं, आम्ही असून नसल्यासारखे. मीं म्हटलें, बरें आहे बच्च्याजी, ह्या काळो-खांतून बाहेर काढीन; पांच वेळां पत्रिकेंत बुडी मारली---

**स्नेहलताः**---आणि पांच वेळां तुमचेंच तोंड काळें होऊन तुमची फजिती झाली !

**दिनेश्वरः**---फजिती म्हणून काय विचारतेस ? मीच आंधळा झालों; पण सहाव्या वेळेला---

**स्नेहलता:**—श्रीकृष्ण लांब द्वारकेस निघून गेल्यावर—

**दिनेश्वर:**—ग्रह सांपडले, लगेच मीं भविष्य वर्तविलें, परवां गोरज मुहूर्तावर रुक्मिणीचें लग्न होणार !

**स्नेहलता:**—श्रीकृष्णाशीं असेंचना ?

**दिनेश्वर:**—श्रीकृष्ण आले तर त्यांशीं; नाहीं तर शिशुपालाशीं; शिशुपाल नाहीं, तर दुसऱ्या कोणाशीं; पण ताईसाहेबांचें लग्न मात्र थांबत नाहीं, हें ठाम ज्योतिष ! [ महाराणी येते.

**महाराणी:**—आतां नाहींना परवांच्या पुढें लग्न जाणार ?

**दिनेश्वर:**—आतां खात्रीनें लग्न पुढें लांबत नाहीं. महाराणीसाहेब, परवांचा मुहूर्तच असा आहे कीं गेल्या हजारपांचशें वर्षांत असा मुहूर्त आला नव्हता, व पुढेंहि हजारपांचशें वर्षांत असा मुहूर्त येणार नाहीं. ह्या मुहूर्तावर जिचें लग्न होईल, तिला आठ मुलगे आणि आठ मुली झाल्याच पाहिजेत. काल मला एकानें एक कालवड दिली, मी देखील त्याला सांगितलें कीं, परवांच्या दिवशीं गोरज मुहूर्तावर आमच्या घरीं आणून ती कालवड बांध; म्हणजे सोळा वेतांचा खरवस शेजाऱ्यापाजाऱ्यांना वांटावयास सांपडेल !

**महाराणी:**—कायग स्नेहलते, आतांशा रुक्मिणीचें मन तितकें उदासीन नाहीं ना? काल शिशुपालमहाराज व सम्राट जरासंध ह्यांचा नगरप्रवेश झाला; तो थाट पाहून रुक्मिणीचे मनाला बरें वाटलें का ?

**स्नेहलता:**—तो समारंभ पहावयास ताईसाहेब बसल्याच नाहींत ! शिशुपालमहाराजांची अंबारी त्यांनीं लांबून पाहिली, आणि त्यांचा कपाळशूळ जास्ती झाला; आम्ही बगीच्यांत गेल्यावर त्यांना थोडेसें बरें वाटलें. तेथें गोकुळांतील कृष्णलीला आठवून पुन्हां पुन्हां मला पूर्वीच्याच जुन्या गोष्टी सांगून सांगून ताईसाहेब जेव्हां थकल्या, तेव्हां त्यांचा थोडासा डोळा लागला ! गोकुळच्या कृष्णलीलांचा निदिध्यास ताईसाहेबांना लागला आहे; पण तें एक त्यांच्या रोगावर औषधच झालें आहे.

**महाराणीः**—बापाची आणि लेकीची दोघांची प्रकृति सारखीच ! तिकडचाहि म्हणें काल कपाळशूळ जास्त झाला होता; शिशुपालमहाराजांचें व रुक्मिणीचें लग्न लागलें म्हणजे सर्व रोग पार पळून जातील.

पद ४५ ( राग—खमाज, ताल—त्रिवट. चाल—'नैनन समारही.' )

**होईल विवाह हा, न मानी दाहा; पळतील सर्व रोग, हृदय हनन, नयन—दहन, गलितचरण ॥ धृ० ॥ कोप गेंदसम झेलुनी हातीं, मोहिल मन, रमविल कुशल रमण ॥ १ ॥**

काय हो दिनेश्वर, त्यांचे ग्रह आजकाल कसे आहेत, पाहिलेत का ?

**दिनेश्वरः**—मीं आजच पत्रिका तपासली; शनि सांप्रत मस्तकावर पडला आहे. हा शनि पालटेतों—म्हणजे दोनअडीच वर्षांत शिशुपालमहाराजांना पहिला मुलगा होईतों—कपाळशूळ कमी व्हायचा नाहीं. मंगळ सांप्रत पोटांत आहे; लग्नकार्यांतलें एकहि पक्वान्न महाराजांना पचावयाचें नाहीं; उलटया होतील !

**महाराणीः**—ह्या लग्नाची सगळी व्यवस्था मला एकटीला ठेवावी लागत आहे.—कालचा नगर—प्रवेशाचा समारंभ थाटाचा झाला ना ग स्नेहलते ?

**स्नेहलताः**—थाटाचा म्हणून काय विचारावें ? सर्व रस्ताभर तोरणें इतकीं लावलेलीं होतीं कीं, भर दोनप्रहरीं सूर्याला कुंडिनपुरांतून हांकून दिलें आहेसें वाटलें ! शिशुपालमहाराजांच्या हजारों हत्तीचें जवाहीर ताऱ्यांप्रमाणें एकसारखें चमकत असल्यामुळें काळोखांतून मिरवणूक निघाल्यासारखी वाटली नाहीं इतकेंच !

**महाराणीः**—शिशुपालमहाराज सूर्यासारखे दैदिप्यमान दिसल्यामुळें आकाशांतील सूर्यानें तोंड लपविलेसें मला वाटलें !

पद ४६ ( राग—तिलंग, ताल—त्रिवट. चाल—'मोहेलीना नेक नजर यानी. )

**लपविला लाल गगन—मणि, परि दिन अशुभ होत नच, दृष्टि न विफला; मगध—समरपति नव रवि उगवला ॥ धृ० ॥**

योग्यचि वर मम, सुखविल बाळा; शुभ दिन अजि सुता
वरिल बघ शिशुपाला ॥ १ ॥

काळच्या नगरप्रवेशाचे थाटासारखाच थाट श्रीजगदंबेच्या दर्शनाला नवऱ्या-मुलीनें जातांना करावयाचा आहे. अंबिकेच्या देवळासमोरचें तें मैदान विस्तीर्ण, पण तेथें देखील भर दोनप्रहरीं सूर्याच्या एका किरणालाहि आगांतुकांचें यश संपादतां यावयाचें नाहीं.

**स्नेहलता:**—निळ्या व अस्मानी रंगाच्या तोरणांनीं सर्व मैदान असें आच्छादलें गेलें पाहिजे कीं, तारांगणाच्या वरचें आकाशाचें छत ताऱ्यांच्या खालच्या बाजूला आपल्या मैदानावर शिवण्यांत आलें आहे कीं काय असें वाटलें पाहिजे !

**महाराणी:**—आणि हें बघ, स्नेहलते, रुक्मिणी अंबेच्या दर्शनाला निघाली म्हणजे तुम्ही सर्वजणी तिच्या सख्या तिच्या सभोंवतीं असा, म्हणजे चंद्रच सर्व ताऱ्यांसह आपल्या रस्त्यांतून चालतो आहेसें वाटेल. [ चंद्रेश्वर येतो.

**दिनेश्वर:**—अरे हा खराच माझा चंद्रया आला ! मूर्तिमंत चंद्र अवतरला ! महाराणीसाहेब, मूर्तिमंत चंद्र आला !

**महाराणी:**—बरे वेळेवर आलां द्वारकेहून ! मला काळजी पडली होती, लग्नाचे आधीं तरी येतां कीं नाहीं ! लग्नपत्रिका यादवांना दिलीत ना ?

**चंद्रेश्वर:**—दिली, व श्रीकृष्णाला सर्व हकीकत सांगितली.

**महाराणी:**—ते येणार आहेत काय ? ते काय म्हणाले ? लवकर सांगा.

**चंद्रेश्वर:**—कांहीं बोललेच नाहींत; मला दोन दिवस ठेवून घेतलें, वस्त्रालंकार देऊन माझा सन्मान केला, आणि लग्नासंबंधानें कांहीं न बोलतां मला निरोप दिला.

**महाराणी:**—बरें झालें; एक काळजी दूर झाली. स्नेहलते, आतांचे आतां यांना रुक्मिणीकडे घेऊन जा; श्रीकृष्ण येत नाहीं असें तिला एकदां

कायमचें समजलें–हो, निराशेसारखें सुख नाहीं–लग्नाच्या वेळेला ती चंद्रासारखी सतेज दिसेल !

**दिनेश्वर:**—त्याची नको आतां काळजी; माझा चंद्र आला आहेना ! ताईसाहेब आजारी पडल्या तरी हा प्रत्यक्ष चंद्र आहेना ?–मिरवणुकीबरोबर आम्ही सूर्यचंद्र असलों म्हणजे रस्त्यांतला काळोख नाहींसा होईल.—

**महाराणी:**—दिवे ओवाळा तुमच्या तेजावरून ? चल स्नेहलते, चल माझ्या देखतच रुक्मिणीचें आणि ह्या चंद्रेश्वराचें बोलणें होऊं दे. [ जातात

---

## प्रवेश दुसरा.

[ **स्थळ:**—बगीचा, मुलींचा नाच चालला आहे. ]

नाचाचें पद ४७ ( ' मेरो दिलको चुराके ' )

**बध शिके लता मी नगरची कला । अशा या वनीं शांत दिसे हें नगर, फिरे हा महावात म्हणे मी नृपवर; सकल नृपति विटप गमति, वदति ' करचि लग्न ' मला ॥ धृ० ॥ वनश्रीकरीं पुष्पमाला विराजे; नवी माळ ही लग्नवेळेसि साजे; महा वायु तो तीव्र वेगेंचि आला; नसे बंधु हा लग्न मोडोनि गेला । वरावें कुणाला न ठावें मनाला, धरी ह्या कराला वसंता सुकाला ॥ १ ॥**

[ रुक्मिणी, स्नेहलता व चंद्रेश्वर येतात. ]

**रुक्मिणी:**—स्नेहलते, या मुलींचें गाणें मला मुळींच आवडेनासें झालें आहे. गोकुळांतील गवळयांच्या मुली जीं गाणीं म्हणतात व जसली रासक्रीडा करितात, तसला नाच नाचा म्हणून मीं यांना सांगितलें ? पण बाई, नगरांतला ढंग कांहीं यांचा सुटत नाहीं. ह्यांना मी पुष्कळ समजावून

सांगितलें; पण ह्यांना वाटतें, ह्या राजवाड्यांतच आहेत आणि राजकन्ये-पुढेंच ह्या गात आहेत ! राजवाड्यांत गाणाऱ्या नाचणाऱ्या मुली आपण नसून खरोखच गवळ्यांच्या मुली आपण आहोंत, असें ह्यांना वाटलें पाहिजे; गोकुळांतील गोपकन्यांप्रमाणें ह्या जेव्हां गाऊं लागतील, नाचूं लागतील, तेव्हां मग मला वाटेल, मुख्य गवळण राधा मीं आहे. राधेनें हांक मारली म्हणजे श्रीकृष्ण येतात, असा गोकुळचा अनुभव आहे, नव्हे ? स्नेहलते, मी कधींग राधा होईन ? माझ्या हांकेसरशीं ते कधींग धावून येतील ? स्नेहलते, ह्यांना रासक्रीडा नीट शिकीव; चंद्रेश्वराला बरोबर घेऊन मी पली-कडल्या गवळीवाड्यांत थोडा वेळ जाऊन येतें. तेथल्या त्या गाई आणि गवळणी पाहिल्या म्हणजे गोकुळचें वारें माझ्या अंगांत शिरेल, आणि श्रीकृष्णाचें ध्यान चांगलें साधून माझी हांक त्यांना ऐकूं जाईल.

[ स्नेहलता व मुली जातात.]

ह्या नगरच्या मुली माझ्या दृष्टिआड झाल्या; गोकुळचें वारें अंगांत शिरून आतां मला थोडेंसें बरें वाटलें.—हो हो, वाटूं लागलें, मी राधा आहेसें वाटूं लागलें.

**पद ४८** ( राग—देसकार, ताल—तिताला ‘ अमलारा माता ’ या चालीवर. )

**अजि राधा बाला मीच गोपाला ॥ धृ० ॥ आलें चारायाला**
**धेनूंना; मोहिलें कंठ—मधुबलें कृष्णाला ॥ १ ॥**

**चंद्रेश्वर:**—( स्वगत ) स्नेहलतेला व मुलींना मोठ्या चातुर्यानें ताई-साहेबांनीं हांकून दिलें; आपणहि येथून जावें हें बरें. ( उघड ) ताईसाहेब, आपण गवळीवाड्यांतून जाऊन येईतों मी या मावळत्या सूर्याला अर्घ्यें देऊन येतों; मला परवानगी असावी.

**रुक्मिणी:**—पण मला अगोदर असें सांगा, मला कळवायला त्यांनीं कांहींच कसा निरोप सांगितला नाहीं ?

**चंद्रेश्वर:**—मी सांगितलेंना ताईसाहेब, मी द्वारकेहून निघालों तों मजबरोबर गोकुळचा एक गवळी कुंडिनपुरास यावयास निघाला. मीं वाटेंत त्याला विचारलें, तूं कुंडिनपुरास कशाला येतो आहेत ? तो म्हणाला, माझे संबंधी कुंडिनपुरास असून राजकन्येच्या विवाहाची मौज पहाण्याकरितां मी येत आहें. आज सकाळीं तो मला पुन्हां भेटला व आपल्या दर्शनाची इच्छा त्यानें दर्शविली; त्याच्यापाशीं कांहीं तरी निरोप असला पाहिजे.

**रुक्मिणी:**—हें तुम्ही मला आतां महालांत सांगण्याबरोबर मी तशीच गवळीवाडयाकडे जावयास निघालें; तुमचा अंदाजच खरा असला पाहिजे—त्याजपाशीं कांहीं तरी निरोप असला पाहिजे.—तो गोकुळचा—द्वारकेचा—त्याच्यावरच तुमच्याहून अधिक विश्वास.—त्याजपाशीं काय ते म्हणाले, कांहीं त्यानें सांगितलें का ?

**चंद्रेश्वर:**—मजपाशीं कांहीं बोलला नाहीं; पण आपल्या दर्शनाची इच्छा करितो, तेव्हां आपला माझा अंदाज—

**रुक्मिणी:**—नसेना निरोप; तो गोकुळचा व द्वारकेचा—आणि गवळी ! त्याच्या दर्शनाला धांवून गेलें पाहिजे.—जा, तुम्ही सूर्याला अर्घ्यें द्यावयाला जा; मला वाट माहीत आहे.—हें मला सायंकाळीं देवदर्शनच घडत आहे.—जा तुम्ही, मी परत आलें म्हणजे तुम्हांला हांक मारीन.

**चंद्रेश्वर:**—ताईसाहेब, बोलत बोलत बगीच्यांतून बाहेर पडून गवळीवाडयाजवळ आपण आलों.—नदीकांठचीं हींच तीं कुरणें, ह्याच त्या गवळ्यांच्या झोंपडया, ह्या गोशाळा !—मी असा पलीकडे संध्यावंदन करीत बसतों. [ जातो.

**रुक्मिणी:**—माझ्या महालासभोंवारच्या बगीच्यांतून मी एकटी बाहेर पडलें,—मनाला कसें मोकळें वाटलें ! बांधून ठेवल्यासारखें इतक्या दिवस वाटत होतें. तो माझा सुंदर महाल कुंडिनपुरच्याच नव्हे तर सर्व विदर्भदेशाच्या शोभेची सीमा समजला जातो, मानवी कौशल्याची पराकाष्ठा

समजला जातो; पण तेथें माझा कोंडमारा होत होता! येथें कसें मोकळें वाटतें; माझी मी स्वतंत्र आहेंसें वाटतें! आणि गाई चरायची नदीकांठची ही जागा काय कमी सुंदर आहे? सायंकाळच्या कोंवळ्या आरक्त सूर्य-किरणांनीं नटलेले हे तरुवर—कोणत्या नागरिक मनुष्याला असली शोभा पहावयास मिळेल! तांबूस सूर्यकरांनीं आच्छादिलेला हा नदीचा प्रवाह—उगीच नाहीं त्यांना यमुनातीर इतकें आवडलें तें! आणि गाईचीं हीं खिल्लारें!—मदिरेप्रमाणें धनहि मादक आहे म्हणून म्हणतात; असें म्हणणारांनीं ह्या गोधनाकडे पहावें. ह्यांचें दर्शन उन्मादाला शमवितें, ह्यांचा सह-वास भांडणतंटे मिटवितो, ह्यांच्या सेवेला अमृतप्राशनाचें बक्षीस मिळून—खरेंच गोकुळ दुसरें वैकुंठ समजलें पाहिजे!—ते द्वारकेस रहावयास गेले, गोकुळांत राहून गौळणीप्रमाणें त्यांची सेवा करावयाची माझी हौस आतां कशी भागणार? देवा, आपलें व माझें लग्न झाल्यावर पुन्हां गोकुळांत कांहीं काळ रहावयाचें गडे! मी किनई, डोक्यावर घागर घेऊन यमुनेचें पाणी भरून आणीन; घागर मला जड वाटावयाची नाहीं; आपल्या पद-चिन्हांनीं पुनीत झालेल्या यमुनेच्या नाजूक वाळूवर घटकानघटका चालतांना श्रम कोणाला होणार? पण—पण—मी साफ सांगतें हं, खडा मारायचा झाला तर माझ्या हातावर नाहीं तर घागरीवर मारायचा—तसेंहि नको—खड्यानें घागर फुटून मी ओलीचिंब झालेलें मला नाहीं आवडावयाचें—निदान मी रागावलें म्हणजे हंसत मजकडे नाहीं पहावयाचें—हें काय हो, डोक्यावरची घागर फोडून—मला ओलीचिंब करून—असें काय म्हणून हंसत पहावयाचें?—मला आपलेकडे पहातच उभी रहावेसें वाटतें! किती वेळ मी अशी ओलेत्यानें उभी राहूं?—इतर गौळी—गवळणी येथें जमल्या म्हणजे कसें?—ही रुक्मिणी गवळण झाली असली तरी मूळची राजकन्या आहे; मला नाहीं गडे इतकें निर्लज्ज होतां येत.

पद ४९ ( राग—भैरवी, ताल—दीपचंदी. चाल—'ना मारो पिचकारी.' )

**नृपकन्या तव जाया, आर्या; सुखविलासीं सोडीना विनया ॥ धृ० ॥ वस्त्राच्छादना विरल कराया भिजवितां कां मम काया ॥ १ ॥**

हां, आतां कसे वाटेवरून दूर झालांत ! फार दूर जाऊं नका गडे, फार दूर जाऊं नका.—काय म्हटलेंत, तूं राजकन्या आहेस म्हणून मी तुझा मार्गच सोडून देतों ?—नाहीं हो मी राजकन्या नाहीं, गवळण आहें गवळण— गेले; मला दिसेनासे झाले.—राजकन्या ह्या शब्दानें माझ्या गोड स्वप्नाचा भंग केला ! गोकुळच्या आठवणीनें मला जें स्वप्न पाडिलें—नाहीं तें स्वप्न नष्ट झालें नाहीं—गवळयांच्या ह्या झोंपडयांच्या—नव्हे नव्हे—माझ्या स्वतःच्या घराच्या इतक्या जवळ आल्यावर—मी गवळणीसारखीच वागणार, राजकन्येच्या आठवणीचा मागमूसहि नको,—मी गवळणीसारखीच वागणार.— आहेंच मी गवळण.—पण येथें दुसरें कोणीच नाहीं, हें कसें ?—घरांत कोणी नाहीं का ? मी घरधनीण घराकडे आलें, कोणी नाहीं का आंत ?— हो, हो, कंसवध करायला गेले आहेत होय ?—सर्व गोपाळांना बरोबर घेऊन कंसवध करायला गेले आहेत ?—आतां तुम्हांला कळेल राजकन्याच तुमची बायको कां असायला पाहिजे तें.—कंसवध करायला तुम्ही गेला आहां, असें समजतांच बाकीच्या गवळणी रडत बसतील ! मी नाहीं रडत बसायची. तुमचीं घरचीं सर्व कामें मी करीन; दूरवर गेलेल्या गाईंना गोशालेकडे परतवून मी आणीन; मी गाईचें दूध काढीन; आणि कंसवध करून आपण परत येतां तों आपणांपुढें दुधाचा पेला ठेवीन.—वीरांचा सन्मान कसा करावा, हें बाकीच्या गवळणींना काय समजणार ?—रुक्मिणी ते आतां इतक्यांत कंसवध करून येतील. चार गाई गोळा कर, आणि झटपट त्यांचें दूध काढ.—गाईनों, या, तुमच्या दुधावर पुष्ट झालेले वीर

दुष्ट कंसाचा संहार करून परत येत आहेत, युद्धांतला शीण तुमच्या दुधाशिवाय दुसऱ्या कशानेंहि नाहींसा होणार नाहीं.

पद ५० ( राग–मालकंस, ताल–तिताला; 'कृष्णमाधो राम' या चालीवर. )

**वैरि मारायाला, ही गोशाळा ॥ धृ० ॥ प्रमुदित माता, रिपुबल नमवितां; करि मृदुल अरि–वध; सबल अबला ॥ १ ॥**

[ चोहोंकडून सवत्स गाई येतात. ]

हा काय चमत्कार ! ह्या गाई खरोखरच माझ्या सभोंवतीं जमल्या !–गोकुळाच्या ह्या देखाव्यानें मी कृष्णलीलेंत तल्लीन झालें– हां हां बरोबर आहे–त्यांच्या नांवाचेंच एवढें माहात्म्य असलें पाहिजे.–पण बाई, मी आतां दूध कसें काढूं ? आईनें मला पुष्कळ शहाणी म्हटलें खरें, पण मला दूध कोठें काढतां येतें ?–आणखी एखादें गाणें म्हणूं का ? आणखी गाई गोळा होतील, पण तितक्या सर्वांचें दूध कोण काढणार ? [ वृद्ध गोपाळ येतो.

**गोपाल:**—मी काढीन त्यांचें दूध–तूं कोण अप्सरा आहेस, देवकन्या आहेस, का येथील वनदेवता आहेस ? मला वाटलें गवळण गात असेल. गाण्यानें गाई जमा करणाऱ्या गवळणी पृथ्वीवर आहेत; एक माझ्या ओळखीची आहे; आज दुसरीचें दर्शन होत आहे म्हणून पुढें आलों;–पण तूं गवळण नव्हेस; अप्सरा दिसतेस. आपल्या गाण्यानें गाईंना वश करून घेणारी तूं कोण ? तुझें नांव काय ?

**रुक्मिणी:**—गोपालश्रेष्ठा आपण कोण ? कोठून आलां ? श्रीकृष्णाच्या मुरलीला गाई जितक्या वश होतात तितक्याच वश कोणत्या गवळणीच्या गाण्याला होतात हें प्रथम मला सांगा; म्हणजे मग मी माझें नांव आपणांस सांगेन.

**गोपाल:**—मी गोकुळचा गवळी, मी हल्लीं द्वारकेस असतों.

**रुक्मिणी:**—आपण येथें केव्हां आलांत ?

**गोपालः**—आजच आलों.

**रुक्मिणीः**—आपल्या दर्शनाचा अनुग्रह आमच्या ह्या देशावर कां केला? द्वारकाधीश श्रीकृष्ण ह्यांनीं कोणाला कांहीं निरोप कळवायला सांगितला आहे काय?

**गोपालः**—मजपाशीं कांहींच सांगितलेलें नाहीं. मी दुसऱ्या कोणाच्या सांगण्यावरून कुंडिनपुरांत आलों नसून आपण होऊन कुंडिनपुरास आलों आहें. त्या चंद्रेश्वर ज्योतिषाबरोबर रुक्मिणीच्या विवाहाची लग्न-चिठ्ठी द्वारकेस आली त्या वेळीं मी श्रीकृष्णाजवळच होतों—

**रुक्मिणीः**—त्यांनीं आपणास पाठविलें ना? मग सांगून टाकाना त्यांचा निरोप काय तो?

**गोपालः**—त्यांनीं नाहीं पाठविलें, मी आपण होऊन आलों; रुक्मिणीचें व शिशुपालाचें लग्न ठरलें, असें वाचून श्रीकृष्णानें लागलाच निश्चय केला, आपलेंहि लग्न ताबडतोब उरकून टाकायचें, उगीच लांबणीवर टाकावयाचें नाहीं. लगेच आम्ही आपण होऊन नवऱ्यामुली पहाण्याकरितां बाहेर पडलों. विदर्भदेशांत नवऱ्यामुली पाहण्याकरितां मी आलों.—नवऱ्यामुलीच्या अंगीं दोन गुण असले पाहिजेत असा श्रीकृष्णाचा हट्ट आहे.

**रुक्मिणीः**—कोणते ते गुण?

**गोपालः**—ती रुक्मिणीहून अधिक सुंदर, निदान रुक्मिणीइतकी सुंदर असली पाहिजे. नवऱ्यामुलीच्या अंगीं हें असलें सौंदर्य तरी किती असावें लागतें, हें मला समजावें म्हणून मीं चंद्रेश्वराला म्हटलें, मला रुक्मिणीच्या दर्शनाला घेऊन चला.

**रुक्मिणीः**—रुक्मिणीच्या इतकी सुंदर बायको जर त्यांना पाहिजे असली तर रुक्मिणीशींच त्यांनीं लग्न केलें पाहिजे. कारण रुक्मिणीइतकी सुंदर स्त्री त्रिभुवनांत दुसरी मिळावयाचीच नाहीं.

**गोपालः**—विदर्भदेशाचा हा एक गर्व आहे इतकेंच! मोठमोठ्या राजवाड्यांतून रुक्मिणीइतकें सौंदर्य दृष्टीस पडावयाचें नाहीं हें कदाचित् खरें असेल, पण गोकुळच्या राधेला ज्यांनीं पाहिलें असेल ते खात्रीनें असें म्हणतील कीं, राजवाड्यापेक्षांहि अधिक सरस सौंदर्य गाईंनीं गजबजलेल्या झोंपड्यांतून नांदत असतें. मी रुक्मिणीला पाहून येणार आणि राधेहून ती अधिक सुंदर नाहीं असें मला वाटलें कीं, मी सर्व गवळ्यांच्या झोंपड्या पहाणार आणि कृष्णाची बायको शोधून काढणार.

**रुक्मिणीः**—माझ्या शेजारीं जर राधेला उभी केली तर मी अधिक सुंदर दिसेन का राधा?

**गोपालः**—मजसारख्या म्हाताऱ्यांना राधा अधिक सुंदर दिसेल; पण श्रीकृष्णासारख्या तरुणाला—

**रुक्मिणीः**—मी अधिक चांगली दिसेन. बरें झालें, माझ्या मनांतली भीति दूर केलीत.–नवऱ्यामुलीच्या अंगीं दुसरा कोणता गुण असायला पाहिजे तो मला सांगा पाहूं?

**गोपालः**—श्रीकृष्णाची अट नवरी मुलगी रुक्मिणीहून अधिक सुंदर पाहिजे; दुसरी अट श्रीकृष्णाची नाहीं, राधेनें ती अट घातलेली आहे.

**रुक्मिणीः**—राधेनें! राधेनें काय म्हणून?

**गोपालः**—अग श्रीकृष्ण राधेच्या अर्ध्या वचनांत! ती सांगेल तसें निमूटपणें ऐकून घेतो. गोकुळांत व द्वारकेंत सर्वांना माहीत आहे, राधेशिवाय श्रीकृष्णाच्या घरचें पान हालत नाहीं. कंसवधाला श्रीकृष्ण सज्ज झाला, राधेचें प्रथम दर्शन घेतलें! मथुरेच्या युद्धाला प्रारंभ झाला, त्या वेळीं राधेची संमति प्रथम! रुक्मिणीच्या स्वयंवराला स्वारी निघाली, जेव्हां राधेनें जा म्हणून सांगितलें तेव्हां! मथुरेच्या दुसऱ्या युद्धाचे वेळीं द्वारकेकडे यादव मागें हटले, कारण राधेला तें पसंत पडलें! आणि शिशुपालाला रुक्मिणी देत आहेत असें कळल्यावर प्रथम राग आला राधेला!

राधेनें सांगितलें कीं, विदर्भदेशाचा नक्षा उतरविण्याकरितां तात्बडतोब श्रीकृष्णाचें लग्न झालेंच पाहिजे. त्या वेळीं तिनें बजावलें, रुक्मिणीहून कुरूप मुलगी असली तरी चालेल, पण सौंदर्यापेक्षा हा दुसरा गुण तिच्या अंगीं असलाच पाहिजे. एक वेळ कुरूप मुलगी श्रीकृष्ण पत्करील, पण राधेची अट त्याच्या हातून मोडवणार नाहीं. कारण श्रीकृष्ण राधेच्या हातांतलें बाहुलें आहे !

**रुक्मिणीः**—अशी कोण ही राधा ? त्यांच्यावरहि हुकमत चालविणारी अशी कोण ही राधा ?

**गोपालः**—राधा श्रीकृष्णाचा गुरु, शिशुपणींचा गुरु, कुमारावस्थेची उपासना करून तारुण्याला कल्याणप्रद वळण देणारा गुरु !

**पद ५१** ( राग–जैजेवंती, ताल–झपताल, चाल–'चंद्रबदन राधिका.' )

**गुरु सुरस गोकुळीं, राधिका मिरवली कृष्णाजवळी बाळी ॥ धृ० ॥ प्रेमीजन कनवाळू, मन मिळवी मग शिकवी उपजतचि ज्ञाना–विज्ञाना सुवेळीं ॥ १ ॥**

राधेनें कृष्णाला गाई चारावयाला शिकविलें, राधेनें कृष्णाला गाईचें दूध काढावयाला शिकविलें, राधेनें कृष्णाला मुरली वाजवायला शिकविलें, आणि आपल्याबरोबर गाई चारावयास आलेल्या गोपगोपींशीं रासक्रीडा करून स्वकर्म सुखानें करण्याचा धडा राधेनें कृष्णाला शिकविला. गोपगोपींत व गोशाळेंत अशा रीतीनें श्रीकृष्णाचें मन तल्लीन झालें असतांना, स्वकीयांचें रक्षण करण्याकरितां गोवर्धन संभाळून धरण्याच्या व कालियामर्दन करण्याच्या साहसाला राधेनें प्रोत्साहन दिलें; आणि कंसवध तुझ्या आटोक्यांत आहे असें कृष्णाला सांगून रणभूमीवर निःशंक संचार करण्याची धमक राधेनें श्रीकृष्णांत उत्पन्न केली !

**रुक्मिणीः**—असें, असें, श्रीकृष्णाकरितां ज्या नवऱ्यामुली तुम्ही पहात आहां, त्यांनीं राधेला सासूबाई म्हणून नमस्कार केला पाहिजे; असेंच ना ?

**गोपालः**—नुसतें सासूबाई म्हणून नव्हे, तर गुरु म्हणून राधेच्या पायांवर डोकें ठेविलें पाहिजे. श्रीकृष्णांनीं तर यादवांना व गोपगोपींना तशी आज्ञा केली आहे. महत्वाकांक्षी पण निर्लोभ, साहसी पण संतुष्ट, लढणाऱ्या पण कुरवाळणाऱ्या प्रेमळ पुरुषार्थाचा उपदेश राधेनें कृष्णाला केला; म्हणून द्वारकेस कायमची वस्ती करण्यास जाण्यापूर्वी गोकुळाच्या सर्व गोपगोपींना श्रीकृष्णांनीं विनंति केली, माझी आठवण होऊन माझें नांव उच्चारावेसें जर तुम्हाला वाटलें, तर अगोदर माझ्या गुरूचें—राधेचें—नांव उच्चारीत चला. गोकुळांत सर्व गोपगोपी आजकाल "राधाकृष्ण—राधाकृष्ण" ह्याच नांवानें कृष्णाला संबोधित असतात.

**रुक्मिणीः**—अग बाई, हा गुरु प्रेमळ खरा, पण फार कांटेकोर दिसतो !—नवरी मुलगी पसंत करण्याची राधेची अट कोणती, तें मला आतां लवकर सांगा.

**गोपालः**—गोकुळांतून द्वारकेकडे जातांना श्रीकृष्णांनीं राधेला विनंति केली, गोकुळ, वृंदावन किंवा मथुरा येथें असतांना तुझ्या सहवासामुळें माझ्या हूडपणाच्या हातून चूक झाली नाहीं; पण पुढील आयुष्यांत माझ्या शेजारीं नेहमीं कोण राहील आणि मला नियंत्रित कोण करील ? त्या वेळीं राधेनें सांगितलें, मी सांगतें तसल्या नवऱ्यामुलीशीं लग्न कर म्हणजे तुझें तारुण्य कल्याणाचे मार्गापासून ढळणार नाहीं.

**रुक्मिणीः**—पण त्या वेळीं रुक्मिणीशीं लग्न करण्याचा श्रीकृष्णाचा निश्चय झालेला होता !

**गोपालः**—तें खरें; पण राधेनें सांगितलें रुक्मिणी असो वा दुसरी कोणतीहि राजकन्या असो, द्वारकेच्या राजाच्या पट्टराणीचा मान राधेचें व्रत पाळण्याची शक्ति ज्या मुलीच्या अंगीं आहे, अशाच मुलीला मिळाला पाहिजे.—राधेचें व्रत प्रेमाचें; सर्व विश्वावर अकृत्रिम प्रेम करणारा राधेचा

स्वभाव आणि श्रीकृष्णाच्या चरित्रांत बेहोषपणें स्वतःला मिसळून घेऊन गोकुळ आनंदित करणारी राधेची वृत्ति ! श्रीकृष्णाला राधेच्या त्या प्रेमळ शक्तीचा पारच लागेना ! तेव्हां त्यानें राधेलाच विचारलें कांहीं तरी बाहेरची खूण मला सांग, म्हणजे मला माझी पट्टराणी ओळखण्यास बरें पडेल.

**रुक्मिणीः**—तीच खूण कोणती, तें मला लवकर सांगा.

**गोपालः**—जिच्या गाण्याला मोहित होऊन गाई सभोंवार जमतात, ती नवरीमुलगी तुझी पट्टराणी होणार, असें राधेनें कृष्णाला सांगितलें.

**रुक्मिणीः**—मग मीच श्रीकृष्णाची पट्टराणी होणार, मीच होणार–हो मीच होणार–या गायी साक्षी आहेत, ही गोशाला साक्षी आहे, आपण साक्षी आहां ! माझ्या रूपानें राधाच प्रत्यक्ष सांगत आहे, मीच श्रीकृष्णाची पट्टराणी !–चला, तुम्ही मला आतांचे आतां द्वारकेकडे घेऊन चला; आणि त्यांना सांगा, हीच तुमची पट्टराणी.–मी राधेची शिष्यीण ! राधेचें प्रेम माझ्या अंगांत संचारलेलें ! राधेच्या प्रेमानें नटलेल्या ह्या नवऱ्यामुलीहून रुक्मिणी काय अधिक सुंदर दिसणार आहे ?–चला, असेच आपण द्वारकेकडे जावयाला निघूंया.–काय, नको म्हणतां ?

**पद ५२** (राग-गुजरी तोडी, ताल-तिताला ‘ रूपजौबन गुण धरो, ’ या चालीवर.)

**जरि या तव धरशील विरोधा; गुरु ना तव ती राधा ॥ धृ० ॥**
**मज न मानितां, प्रेमळ राधा साहिल कैसी अपराधा ॥ १ ॥**

**गोपालः**—नवऱ्यामुलीची टेहळणी करण्याचें काम तेवढें मीं पत्करलें आहे. मला कांहीं तुला बरोबर घेऊन जातां येत नाहीं. अशी अशी एक नवरीमुलगी आहे एवढी बातमी मी श्रीकृष्णाला देईन इतकेंच ! टेहेळणीहून अधिक काम मीं केलें तर श्रीकृष्णाला राग येईल.

**रुक्मिणीः**—नाहीं हो; मला बरोबर घेऊन चला, ते कांहीं रागावणार नाहींत. न्याच मला आपल्याबरोबर द्वारकेला.

**गोपाल:**—तूं कोण, तुझें नांव काय ? ज्यांचें नांव गांव माहीत नाहीं, अशा नवऱ्यामुली पळवून न्यायला का मी आलों आहें ?

**रुक्मिणी:**—तसें नव्हे हो, कोणी तुम्हाला म्हणणार नाहीं, तुम्ही मला पळवून नेलेंत म्हणून; आणि ज्यांना माझें दुःख माहीत आहे ते कोणीहि म्हणणार नाहींत, मी पळून गेलें म्हणून—मी द्वारकाधीशाची पट्टराणी होणार हें खास; मग तुम्ही मला आतांचे आतां माझ्या नवऱ्याकडे कां नेत नाहीं ? स्वतःच्या घराकडे स्वतःचा नोकर बरोबर घेऊन जाणें, ह्याला कोण म्हणणार पळून जाणें ?

**गोपाल:**—आपण द्वारकाधीशाच्या पट्टराणी होणार, तेव्हां मी आपला नोकरच आहें; पण माझ्या मालकिणीचें नांव गांव तरी नकोका समजायला ?

**रुक्मिणी:**—अहो मी दुसरी तिसरी कोण ? रुक्मिणी, रुक्मिणी, म्हणून म्हणतात तीच मी ! मलाच वरण्याचें वचन श्रीकृष्णानें दिलें आहे; राधेच्या परीक्षेला मीच उतरलें आहे; श्रीकृष्ण जर येथें आले असते—नाहीं आले—तुम्ही आलां ! द्वारकाधीशाची पट्टराणी—विदर्भदेशची राजकन्या—ही रुक्मिणी तुम्हाला आज्ञा करीत आहे, आतांचे आतां द्वारकेकडे निघण्याची तयारी करा.—श्रीकृष्णाच्या पायांची शपथ घेऊन मी तुम्हाला सांगतें, श्रीकृष्णाचें दर्शन घेतल्याशिवाय मी कुंडिनपुरचा राजवाडा पुन्हां पाहणारच नाहीं.

**गोपाल:**—राजकन्ये, तुझें श्रीकृष्णावरील प्रेम निःसीम खरें. शिशुपालाच्या आणि तुझ्या लग्नाची चिठी द्वारकेला आली त्यावेळीं कुंडिनपुरला धावून जावें किंवा कसें, असा संशय कृष्णाला आला. द्वारकेस परत गेल्यावर मी श्रीकृष्णाला कळवीन कीं कुंडिनपुरास धावून जाऊन रुक्मिणीचें हरण करण्याचा विचार करीत असतांना मनांत शंका येऊं दिली, हें त्यानें मोठें पातक केलें. पण आतां तुला द्वारकेकडे नेण्याचें साहस मला करितां येत नाहीं—माझी वृद्धावस्था आणि हें साहस !

पद ५३ (राग—जीवनपुरी, ताल—एकताला. 'दीम दारा दिर दिर' या चालीवर.)

**साहस—मति, भय अति; बहु विगलित गात्रीं नसे उचित**
**शक्ति; नच वपु—बल मम, विमल नच भक्ति ॥ धृ० ॥**
**न करि पाप, न धरि शाप; ही मनासि सुखद शांति; तरुण**
**नसे भयद दिसे अखिल क्रांति ॥ १ ॥**

हें साहस मला नको.—रुक्मी व शिशुपाल—

**रुक्मिणी:**—अहो, ह्यांत साहस कसचें? तुम्ही माझे वाटाडे व्हा म्हणजे झालें; मी सर्व संकटांतून पार पाडून नेईन; श्रीकृष्णाच्या प्रेमाचें कवच माझेंच नव्हे तर तुमचेंहि रक्षण करण्यास समर्थ आहे.

**गोपाल:**—राजकन्ये, तुला पाहिजे तर तूं एकटी जा. मला हें साहस नको, मला हें साहस नको.

**रुक्मिणी:**—बरें आहे, मी एकटी जातें; मला वाटाड्याची जरुरी नाहीं. प्रियकराच्या जवळ गेल्यावर प्रेम आंधळें होतें; पण प्रियकर दूर असल्यावर प्रेमाच्या इतकें डोळस जगांत कोणीहि नाहीं. बरें आहे, जातें मी एकटी. त्यांच्या पायांचें दर्शन झाल्याशिवाय मी पुन्हां माहेर पहाणार नाहीं, अशी आतांच शपथ घेतली आहे. नाहींना येत माझ्याबरोबर?

**गोपाल:**—नाहीं येत; नाहीं येत; नाहीं येत.

**रुक्मिणी:**—नका येऊं; मी एकटीच जातें, मी एकटीच जातें. कदाचित् मी माझ्या शत्रूच्या हातीं वाटेंत सांपडलें तर, ही माळ माझी प्रतिनिधि म्हणून आपल्याजवळ देतें, ती त्यांना द्या. ही माळ त्यांना सांगेल—

पद ५४ (राग—देशी, ताल—धिमा तिताला, 'येरी मैको नाहीं' या चालीवर.)

**त्वरा करा, नाथा, तुझिया नांवा मळवितो राहु खरा ॥ धृ० ॥**
**जगविल आशा मजला नच आतां, गमवितां वेळ जरा ॥ १ ॥**

[ पायांवर माळ ठेवते, गोपाळाचा श्रीकृष्ण होतो व कृष्ण माळ गळ्यांत घालतो ]

**श्रीकृष्णः**—(रुक्मिणीचा हात आपल्या हातांत घेऊन) राजकन्ये, रुक्मिणीस्वयंवर आतां झालें. तूं ह्या वेळेपासून द्वारकाधीशाची पट्टराणी झाली आहेस.

**रुक्मिणीः**—प्राणनाथ, विदर्भदेशाची राजकन्या आपली पट्टराणी झाली नसून आईबापांचें घर सोडून पळून आलेली गरीब गवळण आपण ह्या वेळीं द्वारकेची पट्टराणी केली आहे!

**श्रीकृष्णः**—असल्या गवळणीची सेवा केल्यानें राजकन्यांचा उद्धार होईल.

**पद ५५** (राग–भैरव, ताल–त्रिवट 'हरिरिह मुग्धवधू' या चालीवर.)

**गवळण होउनियां फिरतां, धरतिल तव पद राजसुता ॥ धृ० ॥**
**प्रेमळ कोमल येथ वसें बल, तूंचि नृपति–दल आतां धन्य**
**धन्य बहु होईल वधुगण, ही मम गवळण नमितां ॥ १ ॥**

[पडद्यांत–'गोपालहो, धांवा, धांवा, धांवा; नगराकडे जावयाच्या गाई नगराकडे न जातां या गोशाळेकडे धांवत येत आहेत; लवकर पुढें या व गाईंच्या खिल्लारांना अडवून धरा.]

**रुक्मिणीः**—महाराज, माझ्या गाण्यानें मोहित होऊन चार गाई जवळ आल्यानें स्वर्ग मला दोन बोटें उरल्यासारखा झाला; पण आपण नुसते प्रकटल्याबरोबर नगरच्या सर्व गाई इकडेच धांवून येऊं लागल्या! सौंदर्याचा व कर्तृत्वाचा सर्व अहंकार ह्या पायांच्या दर्शनानें गळून पडतो.

**श्रीकृष्णः**—रुक्मिणी, हे गोपाळ जवळ येत चालले, येथें आतां उभें राहण्याची सोय नाहीं.—चल, माझा पुढचा बेत तुला सांगून तुझ्या महाला-सभोंवारच्या बगीच्यांत तुला नेऊन सोडतों–ह्या वाटाड्याचे मागोमाग असें असें यावयाचें राणीसा हे [श्रीकृष्ण जाऊं लागतो.

**रुक्मिणीः**—( जातांना ) त्रिभुवनाचा अधिकारी माझा मार्गदर्शक झाल्यावर मी आपल्या मागोमाग आल्याशिवाय कशी राहीन ? हीं मुकीं जनावरें देखील आपला मार्ग शोधीत आपल्या मागून धांवत येत आहेत ! मग प्रेमाच्या जोरानें माणुसकीच्या पदाला चढलेले प्राणी आपल्या मार्गानें जाऊन प्रेमाचा आपला संप्रदाय कां चोखळणार नाहींत ?

**पद ५६** ( राग–ललत, ताल–त्रिवट. 'भावेंदा यारदा जोबन' या चालीवर. )

अचला विचला, दाविल तव अचुक पद मार्गाला ॥ धृ० ॥
दिसत पंथ बहु, संशय आला; अचल धर्म तव प्रेमाला ॥ १ ॥

[ पडदा. ]

**अंक चवथा समाप्त.**

# अंक पांचवा.



## प्रवेश पहिला.

[ महाराणी व एक दासी येतात; अंबेच्या देवळांतील एक भाग. ]

**महाराणीः**—माझी मुलगी मोठी भाविक आहे हो !—बाकीच्या नवऱ्या-मुली अंबेच्या दर्शनाला येतात, देवीच्या पायांवर डोकें ठेवितात, आणि लगेच परततात;—पण ही—नाहीं ग पाव घटका झाली, एकसारखी हात जोडून देवीपुढें उभी आहे ! मनापासून प्रार्थना करीत आहे !

**दासीः**—ताईसाहेब म्हणाल्या, घटकाभर देवीची प्रार्थना करीन म्हणून—एकसारखा देवीचा स्तुतिपाठ चालला आहे !

**महाराणीः**—शिशुपालमहाराजांची मर्जी ती हां हां म्हणतां संपादन करील; श्रीजगदंबेचा वरदहस्त आहे माझ्या मुलीच्या मस्तकावर.—तूं पाहून येग, देवीला आळवणें अजून तिचें संपलें कीं नाहीं तें. [ रुक्मी येतो.

**रुक्मीः**—आई, तूंच जा गाभाऱ्यांत; ह्या रुक्मिणीचा चेंगटपणा एकसारखा वाढत चालला आहे.

**महाराणीः**—नाहीं हो ! आतां इतक्यांत बाहेर पडेल; आतां कुठें पाव घटका झाली आहे. घटकाभर देवीचें स्तवन करावें असें तिच्या मनांत आहे.

**रुक्मीः**—घटकाभर देवीचें स्तवन ! घटकाभर कशाला ?—एक घटका जर हिनें येथें घालविली तर जगदंबेच्या पटांगणांतून मिरवणूक बाहेर पडायला आणि लग्नघटका भरायला एकच गांठ पडणार.—देवीच्या पटांगणांतच काय लग्न लावायचें आहे ? मला वाटतें, चेंगटपणानें रुक्मिणी मुद्दाम मुहूर्त चुकवीत आहे.

**महाराणीः**—तसें नाहीं हो; मुलगी मोठी भाविक आहे. देवीची स्तुति-स्तोत्रें जास्ती म्हणत आहे; साहजिकच आहे, शिशुपालमहाराज आपणावर प्रेम करणार नाहींत अशी तिच्या मनाला भीति वाटते, आणि असें एकदां मनांत आलें म्हणजे देवापुढें नाकें घासतां घासतां बायकांना पुरे होतें. मीं तिला पुष्कळ समजावून सांगितलें, अशा प्रसंगीं देवापुढें शंभर वेळां नाक घासण्यापेक्षां नवऱ्यापुढें एक वेळां नाक घासलें तर अधिक गुण येतो; पण माझी मुलगी भाविक आहे; शिशुपालमहाराजांचे पाय धरण्याऐवजीं तिनें अंबेचेच पाय धरले आहेत.

**रुक्मीः**—शिशुपालमहाराजांना प्रेम न करायला काय झालें ? माझ्या बहिणीवर त्यांनीं प्रेम केलेंच पाहिजे. शिशुपालमहाराजांशीं व माझ्याशीं सरळ रीतीनें बोलली चालली म्हणजे पुरे आहे; आम्ही थोडेच दुर्लक्ष तिच्या सुखाकडे करूं ? आई, तूं खरें खरें सांग, रुक्मिणीनें आतां माझ्याशीं वागण्यांत तेढ कां धरावी ?

**महाराणीः**—अरे, तिच्या मनांत श्रीकृष्ण नवरा मिळावा असें होतें; मिळाला असता तर त्यांत कांहीं वाईट नव्हतें, पण तो मिळत नाहीं तर शिशुपाल काय वाईट आहे ? पण इतकें समजायला वय चांगलें प्रौढ व्हावें लागतें. अजुनी पोरवयच नाहीं का रुक्मिणीचें ?

**रुक्मीः**—पोरवय कसलें ? कृति मात्र लहान मुलीसारखी नादिष्टपणाची आहे झालें.—आई, तूं जा गाभाऱ्यांत आणि तिला बाहेर घेऊन ये; ती चेंगट आणि नादिष्ट आहे. आग ती देवीचीं स्तुतिस्तोत्रें म्हणत दोन दोन घटका आंतच बसेल आणि देवीचे पाय धरतां धरतां नादिष्टपणानें देवीला खेळांतली बाहुली समजून तिच्याशीं लडिवाळपणानें बोलत राहील ! आपलें आणि देवीचें अशीं दोनहि भाषणें आपणच बोलून अंबा माझ्याशीं बोलते म्हणून सांगायला चुकावयाची नाहीं !—नादिष्ट आणि चेंगट ! शिशुपाल-

महाराजांसारख्या तडफदार वीराच्या घरीं ही कशी नांदणार, मला काळ-जीच आहे. [ दिनेश्वर व चंद्रेश्वर येतात.

**दिनेश्वरः**—लग्नघटका भरली; ताईसाहेब कुठें आहेत ?–शिशुपाल महाराज वगैरे राजे बाहेर पटांगणांत केव्हांचे उभे राहिले आहेत !–लग्न-घटका भरली, घाई करा.–मी पुढें पळत जातों आणि लग्नघटका भरली असली तरी तशीच हातानें वर धरून मिरवणूक येऊन पोहोंचेपर्यंत लग्न-घटका बुडूं देत नाहीं.–घाई करा, आतां वेळ नाहीं; घाई करा.

**रुक्मीः**—आई, शिशुपालमहाराज आले आहेत तेथें मी जातों; रुक्मि-णीला तूं चटदिशीं गाभाऱ्यांतून बाहेर काढ. [ जातो.

**महाराणीः**—चंद्रेश्वर, तुम्हीच तिला सांगा, लग्नघटका भरली म्हणून.

**चंद्रेश्वरः**—( गाभाऱ्याजवळ ) ताईसाहेब, लग्नघटका भरली; सुमुहूर्तं सावधान; लग्नघटका भरली, सुमुहूर्त सावधान.

[ कृष्ण रुक्मिणीचा हात धरून गाभाऱ्यांतून बाहेर येतो. ]

**कृष्णः**—लग्नघटका भरली, आणि जगदंबेसमोर माझें व रुक्मिणीचें लग्नहि लागलें !

**रुक्मिणीः**—जगदंबेनें आमच्या मस्तकावर लग्नाक्षताहिं टाकल्या.–आई, द्वारकाधीशाची पट्टराणी झालेली ही तुझी मुलगी सासरीं जातांना तुला नमस्कार करीत आहे.

**कृष्णः**—सुनमुखाकरितां द्वारकेस जावयास निघालेला हा आपला जामात आपणास प्रणाम करीत आहे.

**महाराणीः**—जगदंबा तुमचें कल्याण करो,–कृष्णा, तूं रुक्मिणीचें हरण केलेंस; उत्तमच झालें; मला आनंद आहे.–कृष्णा, आतां घाई कर आणि रुक्मी व शिशुपाल यांना कळायच्या आंत रुक्मिणीला कुंडिनपुरांतून घेऊन जा

**कृष्णः**—त्याची काळजी नको.–माझा रथ पश्चिमद्वारापाशीं उभा आहे; त्यांत रुक्मिणीला बसवून मी तिला माझ्या वैऱ्यांच्या देखत घेऊन जातों.

**रुक्मिणीः**—आई येतें मी. (कृष्ण व रुक्मिणी जाऊं लागतात.) आई, बाबांच्याकरितां मीं कांहीं केलेंसें मला वाटतें; दादाच्याकरितां मीं कांहीं केलेंसें वाटतें; पण आई तुझ्याकरितां मीं कांहीं केलें नाहीं, एवढेंच मला ह्या वेळीं वाईट वाटत आहे.

**महाराणीः**—ह्यापुढें पुष्कळ करशील बरें; जा, आपल्या पतीबरोबर लवकर जा; हा शुभमुहूर्त आहे; जा, तुझा संसार सुखाचा होईल.

[ कृष्ण व रुक्मिणी जातात.

मुलींनीं बापाचें देणें द्यायचें असतें, आप्तेष्टांचें देणें द्यायचें असतें, पतीचें देणें द्यायचें असतें; पण आईचें देणें कांहींच द्यायचें नसतें.–रुक्मिणी, आईचें ग कसलें देणें द्यायचें? आपल्या मुलांमुलींनीं आपलें कांहीं देणें लागतें आहे असें जिला वाटतें, ती आईच नव्हे.–रुक्मिणी, तुला मुलेंबाळें झालीं आणि त्यांना खेळवून तूं त्यांचें संगोपन करूं लागलीस, म्हणजे माझें देणें दिलेंस, आणि माझ्या आशीर्वादानें असलें पुष्कळ देणें तूं द्वारकेस देशील बरें बाळे.–दिनेश्वर बरा मुहूर्त साधला नाहीं?

**दिनेश्वरः**—साधला तर! मी तसाच मुहूर्त पाहून दिला होता.–माझें भविष्य कधींच खोटें व्हावयाचें नाहीं. [ पडद्यांत—'हा कृष्णाचा रथ; पाहतां काय, हा कृष्णाचा रथ, पहातां काय!' ]

**चंद्रेश्वरः**—रुक्मी व शिशुपाल यांच्या समोरून रथांत बसून श्रीकृष्ण पार निघून गेले, पार निघून गेले!

**महाराणीः**—माझ्या मुलीचें नशीब आहेच तसें बलवत्तर!

[ पडदा

## प्रवेश दुसरा.

[ रुक्मी, शिशुपाल, शाल्व, क्रथकैशिक, भीष्मक, दिनेश्वर व चंद्रेश्वर येतात. ]

**रुक्मीः**—धिक्कार असो आमच्या शौर्याला व पराक्रमाला!—कृष्णानें रुक्मिणीला आमच्या देखत घेऊन जावें आणि आम्ही निद्रिस्ताप्रमाणें स्वस्थ रहावें!

**शाल्वः**—त्यानें मोहनास्त्र सोडलें असलें पाहिजे! कपटी तो; खात्रीनें त्यानें कपटच केलें; एरवीं आम्हीं असे कसे स्तब्ध उभे राहिलों असतों?

**शिशुपालः**—कृष्ण अवचित आल्यानें आम्ही गांगरलों खरे; पण आमचे रथ तयार झाल्यावर आम्ही त्याला अर्ध्या वाटेंतच गांठल्याशिवाय रहाणार नाहीं.

**रुक्मीः**—कृष्णा, चपलतेमुळें माझ्यापुढें तूं थोडासा गेलास खरा; पण विदर्भदेशाची हद्द ओलांडतोस न ओलांडतोस तों हा रुक्मी तुझ्या छातीवर गुडघा रोंवण्यास चुकणार नाहीं. [ सारथी येतो.

**सारथीः**—महाराज, रथ तयार आहे.

**रुक्मीः**—बाबा, मी आणि शिशुपाल मिळून कृष्णाचा पाठलाग करावयास जातों. आपल्यापुढें मी आज अशी प्रतिज्ञा करितों, कृष्णाला गांठून त्याचा वध करून, रुक्मिणीला बरोबर आणल्याशिवाय मी कुंडिनपुरांत पुन्हां पाऊल ठेवणार नाहीं.

**शिशुपालः**—आम्ही आपल्या दर्शनाला येऊं तर रुक्मिणीला बरोबर घेऊन येऊं; नाहीं तर विदर्भदेशाचें पुन्हां नांव नको.

[ रुक्मी व शिशुपाल जातात.

**क्रथकैशिकः**—कां शाल्व? आपण कां स्वस्थ उभे? आपण जा पाठलागाला.

**शाल्वः**—कृष्ण कपटी आहे, अधर्मानें लढतो; मी अधर्माच्या भानगडींत पडत नसतों.–भीष्मकमहाराज, तुमच्या मुलीच्या लग्नाचा गोंधळ अंबिकेपुढें तुमचा तुम्ही घाला; लग्नाची मौज पाहण्याकरितां आलेले आम्ही सर्व राजे आतां आपापल्या राज्याकडे जातों. [ जातो.

**भीष्मकः**—क्रथकैशिका, कृष्ण फार चतुर, नव्हे ?

**दिनेश्वरः**—महाराज, श्रीकृष्णाचे ग्रहच तसे आहेत, मीं हें भविष्य पूर्वीच वर्तिवलें होतें.

**भीष्मकः**—रुक्मीची आणि त्याची गांठ पडल्यावर काय होतें, याची काळजी आतां मला लागली आहे; एकीकडे आड व एकीकडे विहीर अशी माझी स्थिति आतां झाली आहे.

**क्रथः**—काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. बलराम वगैरे यादववीर फार लांब नाहींत; श्रीकृष्णाचा रथ हां हां म्हणतां यादवसेनेंत पोंचेल. काल माझी व श्रीकृष्णाची गांठ पडली होती, त्यावरून मी सांगतों, सर्व व्यवस्था नीट आहे. रुक्मी फजीत होईल आणि कुंडिनपूर सोडून कुठें तरी राहील इतकेंच.–चंद्रेश्वरानें आज अंबिकेच्या देवळांतील व्यवस्था आम्ही ठरविल्याप्रमाणें ठेविली, आणि अंबिकेच्या पुजाऱ्यांनींहि त्याला चांगली मदत केली, म्हणून आमचा बेत सुरळीत पार पडला !

**भीष्मकः**—चला, अंबिकेच्या दर्शनाला जाऊं, आणि सर्व पुजाऱ्यांना मोठी दक्षिणा देऊन श्रीकृष्णाचे व रुक्मीचे लढाईंत कोणाचे जिवाला धक्का नं लागो अशी अंबिकेची प्रार्थना करूं. [ भी० व क्रथ० जातात.

**दिनेश्वरः**—काय रे मुला, मी एवढा मोठा ज्योतिषी, पण हे मोठे लोक मला आपल्या मसलतींत घेत नाहींत, आणि तुलारे कसें ह्यांनीं आपल्या बेतांत घेतलें ?

**चंद्रेश्वरः**—बाबा, लोकांनीं मोठेपणा द्यावा म्हणून तुम्ही ज्योतिष सांगतां, व मी ज्योतिषाकरितां ज्योतिष सांगतों; त्यामुळें हा असा फरक पडतो. जगांत

ज्योतिष कोणाला नको आहे, असें कसें होईल ? मनुष्यप्राण्याला काळजी आहे, दुःख आहे, आणि पुढचें कळत नाहीं; किंबहुना पुढचें कांहीं कळत नसल्यामुळें मनाला हुरहूर आणि काळजी वाटत असते. शहाण्यासुरत्या माणसाचा सल्ला जसा विचारावयाचा, त्याप्रमाणेंच शहाण्याच्या अकले-बाहेरचा भविष्याचा पडदा दूर करून मनाला आधार देण्याचा प्रयत्न करावयाचा; दोनहि सारखींच ! पण सल्ला विचारला म्हणून जर एखादा शहाणा दुसऱ्याच्या घरांत ढवळाढवळ करूं लागला तर त्याला जसे लोक 'आपमतलबी नीच' समजतात, त्याचप्रमाणें ज्योतिषाचें अवडंबर माजवून दुसऱ्याच्या मसलती आपल्या हातांत घेऊं पाहणाऱ्या ज्योतिषाला लोक—

**दिनेश्वरः**—समजलों समजलों, खोटा म्हणतात असेंच ना ? चंद्रया, रुक्मिणीचें हें असलें स्वयंवर झालें, आणि तूं आपला माझ्याशीं बोलतांना रुक्मीच्याच वळणावर ! चंद्रया, तूं मला व्यवहारज्ञानाच्याहि गोष्टी सांगूं लागलास ! बापाला मानशील कीं नाहीं ?

**चंद्रेश्वरः**—तसें नाहीं बाबा, सहज ओघानें आलें म्हणून बोललों इतकेंच. चला बाबा तिथें अंबिकेच्या देवळांत भीष्मकमहाराज आतां मोठी दक्षिणा वाटतील आणि आम्ही मागें राहूं !

**दिनेश्वरः**—चंद्रया, आतां दक्षिणेच्या वेळीं अग्रपूजेचा मान तूं मला दिला पाहिजेस हं; आणि हें बघ, द्वारकेस तुला सोन्याचें घर दान मिळण्याचे वेळीं दानपत्र माझ्या नांवानें करायला श्रीकृष्णाला सांग. व्यवहारांत मी माझ्यापुढें तुला जाऊं द्यावयाचा नाहीं.

**चंद्रेश्वरः**—बरें तसेंच करूं; चला लवकर.

———

## प्रवेश तिसरा

**स्थळ**--नर्मदातीर. [ शिशुपालाच्या छातीवर गुडघा ठेवून, रुक्मीची शेंडी हातांत धरून श्रीकृष्णानें तरवार उपसली आहे; जवळ रुक्मिणी उभी आहे; असा देखावा. ]

**कृष्ण:**—शिशुपाल, तुझे शंभर अपराध घडेतों मी तुला मारणार नाहीं असें तुझ्या आईला—माझ्या आतेला—मीं वचन दिलें आहे; आणि एवढ्याच करितां तुला मी आज जिवंत सोडीत आहें; पण रुक्मी, तुला जिवंत सोडण्याचें कांहींच कारण नाहीं. तूं ह्या साध्वीचा छळ केलास, तुझ्या बापाला कैदेंत टाकण्यास तयार झालास, असल्या पापाचा पक्का नाश मृत्यूशिवाय दुसऱ्या कोणत्याहि मार्गानें होणार नाहीं.—रुक्मिणी, ह्या दोघांशीं द्वंद्वयुद्ध करून ह्या दोघांना मीं निःशस्त्र केलें आहे; मी ह्यांच्या अंगावर चालून गेलों नाहीं, तर हे माझ्या अंगावर चालून आले, अशा स्वसंरक्षणाचे युद्धांत मीं ह्यांना फजित केलें आहे; आणि युद्धाच्या न्यायनीतीनें ह्यांना ठार मारण्याचा हक्क मला प्राप्त झाला आहे. रुक्मी, जीवदान मागत असलास तरच मी तुला जिवंत सोडतों.

**रुक्मी:**—वैऱ्यापाशीं जीवदान मागणें व मरणें, हीं दोनहि मला सारखींच आहेत. कृष्णा, जीवदान मागण्याची गोष्ट तर एका बाजूला राहूं द्या, उलट मी तुला ह्या वेळीं असें बजावतों, तूं जर मला कांहीं कारणानें जिवंत सोडलेंस तर आजन्म तुझें वैर करण्याचें व्रत कडकडीतपणानें पाळण्यास मी चुकणार नाहीं.

**रुक्मिणी:**—महाराज, मी माझ्या भावाकरितां जीवदान मागतें.

**कृष्ण:**—ह्याला जर मी आतां जिवंत सोडिलें तर जगांत मृत्यूचें काम काय ? मृत्यु सत्कार्याकरितां जगांत वावरत असतो; मी जर ह्याला जिवंत

सोडलें तर विश्वाच्या उभारणीच्या कामीं मृत्यु निरुपयोगी ठरेल. हा रुक्मी पण पापी आहे; ह्याच्या बलाची व पापाची ताटातूट करण्याचा सुलभ मार्ग म्हणजे रणांगणावर मृत्युमुखीं ह्याला फेकणें हा होय! विश्वाची जोपासना व उभारणी ज्यांच्या तपश्चर्येवर अवलंबून आहे, त्या ब्रह्मादिकांनीं फार परिश्रम करून हा मृत्यूचा उपाय शोधून काढला आहे, आणि नेहमींच्या प्रसंगाशिवाय रणांगणावर ह्या उपायाचा उपयोग करण्याचें काम आम्हां वीर पुरुषांकडे सोंपविण्यांत आलें आहे. हें काम मीं जर आतां केलें नाहीं, तर वीरांच्या जन्माला मी वृथा आलों असें होईल. पापाची आणि बलाची फारकत करण्याकरितांच आम्हां वीरांचा जन्म; रुक्मिणी, तूं वीरकन्या आहेस, वीरपत्नी आहेस, तेव्हां तूं हें वीरकर्म आनंदानें पहा.

**रुक्मिणी:**—महाराज, आपण वीरपुरुष आहांत आणि वीराला उचित असेंच कर्म करायला प्रवृत्त झालां आहांत, हें खरें; पण आजचें युद्ध लग्नाच्या पायीं झालें आहे, प्रेमाच्या पायीं झालें आहे, तेव्हां असल्या युद्धाचा शेवट मृत्यूंत होऊं नयेसें मला वाटतें.

**रुक्मी:**—ताई, तुझी विनंति मला मृत्यूहून अधिक असह्य वाटते. कृष्णा, मी तुझा पूर्वीं वैरी होतों, आज वैरी आहें, आणि पुढेंहि वैरीच रहाणार.

**कृष्ण:**—ह्याचें हें बोलणें ऐकलें म्हणजे माझा क्रोध अनिवार होतो; रुक्मिणी ह्याला ठार मारलेंच पाहिजे.

**रुक्मिणी:**—महाराज, आपण सामान्य जनासारखे कां वागतां? आपलें चरित्र लोकोत्तर आहे; प्रेमाच्या वेळीं मृत्यूला दूरवर थोपवून धरण्याचें सामर्थ्य आपल्या अंगांत आहे. वीरांची शक्ति कशाकरितां आहे? प्रेमाचें साम्राज्य पृथ्वीवर पसरावें म्हणूनच ना? विवाहसंबंधानें जर हें युद्ध उपस्थित झालें नसतें, तर आपल्यापाशीं शब्द टाकला नसता. माझ्या लग्नाच्या

पायीं कोठेंहि रक्तपात होऊं नये, अशा सदिच्छेनेंच स्वयंवराचे मंडपांत मी तशी वागलें ना ? माझ्या भावाला जिवंत ठेवून मला संसारांत सुखी करायला आपण समर्थ आहां. मला द्वारकेस न्यावयाचें आणि माझ्या भावालाहि जिवंत ठेवावयाचें–हीं दोनहि कामें पुरुषोत्तमाशिवाय दुसऱ्या कोणाच्या हातून पार पडणार ? पुरुषोत्तमा, [ कृष्णाचे गळ्यांत माळ घालते. ] माझ्या भावाला जीवदान देऊन आपल्या ह्या अर्धांगीला सुखी करा.

**कृष्ण**:—रुक्मिणी, तूं माझी अर्धांगी शोभतेस; किंबहुना माझ्याहूनहि तुझें माहात्म्य अधिक निर्मल आहे.–जा रुक्मी, तुला जिवंत सोडलें आहे. ( सोडून देतो. ) रुक्मिणी, ह्या विजयाच्या वेळीं मीं तुझें आणखी कोणतें प्रिय करूं तें सांग.

**रुक्मिणी**:—प्रसन्न झालेल्या पुरुषोत्तमाच्या पायापाशीं माझें हें मागणें आहे.

पद ६० ( राग–वसंत, ताल–त्रिवट. 'जपिय नाम जाकोजी' या चालीवर. )

**पुरुषशक्ति जोडावी; खरी भक्ती, बहुजन–संगोपन–मनबुद्धि–**
**सकलां अजि द्यावी ॥ धृ० ॥ विश्वसखा हा कृष्ण छत्र**
**मम, कीर्ति तव महिवरी पसरावी;–पतित ही उद्धारि**
**थोरवी ॥ १ ॥**



विक्रीस तयार नवे ग्रंथ विक्रीस तयार

# खाडिलकरांचा लेखसंग्रह भाग दुसरा

यांत कै. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकरांचे १९१८ ते १९२९ पर्यंतचे 'केसरी' 'लोकमान्य' व 'नवाकाळ' मधील लेख असून, कीर्तन परिषद, नाटय संमेलन व साहित्य संमेलन प्रसंगींचीं खाडिलकरांचीं अध्यक्षीय भाषणें या संग्रहांत आहेत. पानें ६००, किंमत ६ रुपये.

# खाडिलकरांचा लेखसंग्रह भाग पहिला

यांत १८९३ पासून १९१० पर्यंतचे केसरींतील व विविधज्ञान विस्तारांतील कै. कृ. प्र. खाडिलकरांचे लेख असून पृष्ठसंख्या ६००, किंमत ६ रुपये.

**पहिलें महायुद्ध (कै. कृ. प्र. खाडिलकरकृत) पांच खंड किं. ५ रु.**

# कृ. प्र. खाडिलकर यांचें चरित्र

कै. खाडिलकर यांच्या वर्षश्राद्धाला प्रसिद्ध झालें असून त्यांचे पुतणे श्री. का. ह. खाडिलकर यांनीं हें 'कृष्ण चरित्र' अठरा अध्यायांत अत्यंत तन्मयतेनें लिहिलें आहे.

पृष्ठें ४०० व भरपूर चित्रें. किंमत ४ रुपये.

# खाडिलकरांची आध्यात्मिक ग्रंथमाला

(१) खाडिलकरांचा रुद्र (२) खाडिलकरांचें संध्यावंदन व पुरुषसूक्त (३) खाडिलकरांचें ऐतरेय आणि ईशावास्योपनिषद् (४) खाडिलकरांचें तैत्तिरीयोपनिषद् (५) खाडिलकरांची ॐकाराची उपासना (६) खाडिलकरांचा याज्ञवल्क्य—मैत्रेयी संवाद व त्रिसुपर्णाची शिकवणूक. प्रत्येकीं किंमत १ रु.